...प्रस्तुत कथासंग्रह श्री. प्रभाकर पाध्ये यांस आदरपूर्वक अर्पण करण्यास मला आनंद वाटत आहे. वेळोवेळीं त्यांनीं कथालेखनाच्या कामीं मला जें उत्तेजन दिलें त्याला मोल नाहीं !

प्रा. वा. ल. कुळकर्णी यांनीं वेळांत वेळ काढून अगत्यपूर्वक साक्षेपी प्रस्तावना लिहून दिली. तीबद्दल त्यांचे आभार मानावेत तेवढे थोडेच होणार आहेत.

'मौजे'च्या भागवत बंधूंचेहि कृतज्ञतापूर्वक आभार मानणे हें माझें कर्तव्य आहे.

या संग्रहाच्या प्रकाशनाच्या कामीं माझे स्नेही श्री. मंगेश पाडगांवकर, श्री. रामदास भटकळ व प्रा. ज्ञानेश्वर नाडकर्णी यांचें विशेष साहाय्य लाभलें. मित्रवर्य श्री. प्रभाकर गोरे यांनीं दृष्ट लागण्याइतकें सुंदर वेष्टन–चित्र काढून दिलें. 'साधना प्रेस'चे श्री. श्रीरंग वरेरकर व त्यांचे सहकारी यांनीं सुबक छपाई करून दिली. या सगळ्यांचे आभार तरी किती मानूं ?

'कशाला जगायचं ?' या कथेखालीं दिलेला १९५१ हा सन अनवधानानें पडला आहे. तो १९४८ असा वाचावा.

या संग्रहांतील 'पाषाण' आणि 'कशाला जगायचं ?' या कथा माझ्या 'जीवनाचीं वस्त्रें' या कथासंग्रहांतून घेतल्या आहेत.

सदानंद रेगे

सदानंद रेगे यांनीं आपल्या लघुकथा–लेखनाला प्रारंभ करून आतां एक तप उलटून गेलें आहे. गंगाधर गाडगीळ, व्यंकटेश माडगूळकर यांच्या-पूर्वींच त्यांनीं आपल्या कथा–लेखनाला प्रारंभ केला असावा. आज त्यांच्या लघुकथांची संख्या शंभरावर गेली आहे. परंतु असें असूनहि आश्चर्याची आणि खेदाची गोष्ट अशी कीं 'काळोखाचीं पिसें' हा त्यांचा पहिलाच नांव घेण्याजोगा कथासंग्रह आहे. तीनचार वर्षांपूर्वी 'जीवनाचीं वस्त्रें' या नांवाचा त्यांचा एक कथासंग्रह प्रसिद्ध झाला होता (असें ऐकतों). परंतु तो कोणाच्याच पाहण्यांत आला नाहीं. (रेगे यांच्याहि तो अगदीं अचानक पाहण्यांत आला.) इतक्या प्रदीर्घ कालावर पसरलेल्या रेगे यांच्या लघुकथा-लेखनाचा जर आलेख काढला तर त्यांच्या प्रत्येक नव्या लघुकथेबरोबर ह्या आलेखाची रेषा सतत वर चढत गेली आहे असें आढळत नाहीं, हें खरें. ह्या आलेखांत जसे उंचवटे आहेत तसेच खांचखळगे आहेत. अनेकदां त्यांच्या कथांनीं फार मोठ्या अपेक्षा निर्माण केल्या; परंतु त्याबरोबर अनेक वेळां त्यांच्या कथा वाचतांना अपेक्षाभंगाचें दुःखहि रसिकांच्या अनुभवाला आलें. आज त्यांच्या कथालेखनाला निःसंशय एक श्रेष्ठ दर्जा प्राप्त झाला आहे; परंतु मला असें नेहमीं वाटतें कीं त्यांच्या निवडक कथांचा संग्रह जर पांच सात वर्षांपूर्वींच प्रसिद्ध झाला असता तर त्यांच्या अलीकडील कथालेखनाचा दर्जा आहे त्यापेक्षांहि उंचावला असता. रेगे यांनीं नेहमींच कथालेखन मोठ्या उत्साहानें परंतु कांहींशा घाईघाईनें केलेलें आहे. कथालेखन हा एक त्यांचा सहजधर्म आहे; आणि त्यांच्या कांहीं कथांच्या स्वरूपावरून पाहतां तो त्यांच्या भावजीवनाचा एक महत्त्वाचा आधारहि असावा. त्यांचें कथालेखन हें जसें अनेक वेळां कथा–निवेदनाच्या उत्साहानें व क्रीडाबुद्धीनें झालें आहे, कांहींवेळां केवळ लेखनकामाठीसाठीं झालें आहे, तसेंच एका मर्यादेपर्यंत तें केवळ आत्मप्रकटीकरणार्थहि झालें आहे. त्यांत त्यांच्या शिणलेल्या मनाला विरंगुळाहि मिळालेला आहे. मला वाटतें, ह्यामुळेंच

त्यांच्या लेखनाला सतत एकसारखा एक दर्जा किंवा tone आलेला नाहीं; म्हणूनच त्यांत उंचसखल भाग फार आहे.

रेगे हे प्रकृतीनें जसे कथालेखक आहेत तसेच कविहि आहेत. अलीकडे तर त्यांची वृत्तिलता एका नाजुक कोमल भावकवितेंतून बहरूं लागली आहे. परंतु आत्माविष्काराकडे असणारी त्यांची सहजप्रवृत्ति त्यांच्या लघुकथा-लेखनांतूनहि आतांपर्यंत प्रकट होत आली आहे : रेगे यांच्या कांहीं उत्कृष्ट लघुकथा ह्या प्रवृत्तींतून जन्माला आलेल्या आहेत. ह्या कथा कांहीं आर्त मनोवस्थांचें मोठें उत्कट दर्शन घडवितात. त्यांच्या पुष्कळशा कथांवर कांहीं भाववृत्तींची ( Moods ) दाट छाया पडलेली आहे. जणुं ह्या भाववृत्तींनीं त्या न्हाऊन निघाल्या आहेत, ह्या भाववृत्तींचे रंग त्यांच्या अंगोपांगांमध्यें भिनलेले आहेत. मृत्यु हा रेगे यांच्या कथांमागील एक अत्यंत प्रबल भावानुभव आहे. मृत्यूनें निर्माण केलेल्या किंवा मृत्यूच्या संदर्भात निर्माण होणाऱ्या भाववृत्तीनें त्यांच्या कितीतरी उत्तम कथांचें वातावरण आर्त बनलेलें आहे. ह्या भावानुभवाच्या कृष्णच्छाया त्यांच्या लेखनांत जागोजागीं तरळत आहेत. अंधार, अमावास्या, काळोख यांना, मला वाटतें, ह्यामुळेंच त्यांच्या लघुकथां-मध्यें कांहीं अनन्यसाधारण स्थान प्राप्त झालें आहे; त्या कथांतील व्यक्तींइतकेंच त्यांनाहि त्यांत जिवंत अस्तित्व आहे. रेगे यांच्या कथांतून त्यांचें वारंवार अगदीं सहजगत्या होणारें आगमन रेगे यांच्या भावजीवनाशीं त्यांचा कांहींतरी गूढ, अतर्क्य संबंध असावा असेंच जणुं सूचित करतें, इतकें तें आगमन त्या त्या ठिकाणीं अर्थपूर्ण वाटतें. हें कविप्रकृतीचें लक्षण आहे. ह्या संग्रहांत संग्रहित न केलेल्या रेगे यांच्या कित्येक कथा वाचतांनाहि मला एक अनुभव वारंवार आलेला आहे : ह्या कथांचा प्रारंभ मोठा बहारदार आहे; त्या सर्वांच्या प्रारंभींच रेगे असें कांहीं एक भावगर्भ वातावरण निर्माण करितात कीं त्याची काव्यात्मकता मनाला झटकन् जाणवल्याशिवाय रहात नाहीं; हें वातावरण रसिक-मनाला भावाकुल करतें, त्या मनांत एक हुरहूर उत्पन्न करतें. त्यासंबंधीं विचार करितांना त्याची निर्मिति ही एक प्रकारच्या आत्मप्रकटीकरणाच्या प्रबल ओढीं-तून झालेली असावी, एका भावार्त मनोवस्थेची ती अपरिहार्य अभिव्यक्ति असावी, ही कल्पना मनांत आल्याशिवाय रहात नाहीं. पुष्कळदां ह्या कथा पुढें

कोलमडतात. प्रारंभीं निर्माण झालेल्या अपेक्षा कथेच्या अधेमधेंच विरघळून जाऊं लागतात व शेवटीं नष्ट होतात. परंतु ह्या पहिल्या परिच्छेदांनीं आपल्या मनावर केलेला भावात्मक परिणाम मात्र अभंग रहातो. मला वाटतें, कथेंतील तेवढ्याच भागाची निर्मिति कलानिर्मितीच्या खऱ्याखुऱ्या प्रक्रियेनुसार झालेली असते : आत्मप्रकटीकरणाच्या एक प्रकारच्या ओढींतून हें लेखन झालेलें असतें व हें कार्य संपतांच त्या लेखनाचा अवतार जणुं समाप्त झालेला असतो. शेवटीं जें उरतें ती लेखनकामाठी असते. तिचा पहिल्या भागाशीं नीटसा कलात्म संबंध नसतो. असें जेथें होत नाहीं, जेथें सबंध कथा एका भावार्त स्थितींतून लिहिली गेलेली असते, जेव्हां एका उत्कट भावानुभवाचें कथन हाच तिचा हेतु असतो, त्यावेळीं रेगे यांच्या कथेला एक आगळें सौंदर्य प्राप्त होतें. प्रस्तुत संग्रहांतील ‘ काळोखाचीं पिसें ’, ‘चाकोऱ्या’, ‘ पाषाण ’, ‘ कशाला जगायचं ? ’ इत्यादि कथा वाचतांना हें लक्षांत आल्यावांचून रहाणार नाहीं.

कथेला सजीव करणारें हें भावार्त वातावरण रेगे कसें निर्माण करितात हें सांगणें सोपें नव्हे; परंतु तें त्यांच्या ह्या कथांतील शब्दाशब्दांतून जाणवतें. त्यांचें त्या वातावरणाशीं एकरूप झालेलें—नव्हे, त्या वातावरणानें संपूर्णपणें भारलें गेलेलें—काव्यात्म मन जेव्हां शब्दांतून अभिव्यक्त होतें, तेव्हां जन्माला येणाऱ्या त्यांच्या लघुकथेची भाषा आपोआपच चित्रमयी व भावसूचक बनते. गद्याचा परिवेष घेऊन मग काव्यच जणुं अवतरूं लागतें : ‘ किरमिजी रंगाची गोजिरवाणी संध्याकाळ सुळूला फसवून निघून गेली नि काळ्या कुळकुळीत पांघरुणांत गुडुप करून बसलेली रात्रीची चेटकीण फिदीफिदी हंसत येऊन पिंगा घालूं लागली ’; ‘ घड्याळाचा पितळी लंबक अंगणांत पिंगा घालणाऱ्या रात्रीच्या चेटकिणीला खूण करून घरांत बोलावीत होता. खुराड्यांतल्या कबुतरासारखी ती अंगणांत घुमत होती. मघांपासून तिच्या अंगांत आलं होतं. बागेंतील गुलाबाचीं फुलं तिनं खाऊन टाकलीं होतीं ’; ‘ संध्याकाळ झाली. मिणमिण दिवे काळोखाच्या नदींतून तरंगूं लागले. . .हळू हळू काळोखाची नदी फुगूं लागली. काळोखाचा गलेलठ्ठ प्रचंड अजगर सैरावैरा पळूं लागला. काळोखाचीं पिसं दिशादिशांतून भुरभुरूं लागलीं ’; ‘ रेडिओ लागला होता नि ढगांनीं चांदणं गाळावं तसा अंधार त्या

गाण्याचे सुगंधी सूर गाळीत होता.' त्यांच्या ह्या कथांतील अशीं किती तरी वाक्यें एकदम डोळ्यासमोर येतात. त्यांची काव्यात्मता आणि चित्रमयता तीं वाचतांच ध्यानांत येण्याजोगी आहे. आपल्या मनावर होणाऱ्या सदर कथांच्या भावात्मक परिणामाला ह्या वाक्यांनीं किती हातभार लावलेला असतो हें कथा वाचीत असतां व वाचून झाल्यावर सहज लक्षांत येतें. कांहींवेळां तर रेगे यांची कथा वाचतांना मधूनच असा परिच्छेद येतो : " जागृति... निद्रा... संवेदना... भावना... जाणीवा... नेणीवा... तेज... वायु... आप... पृथ्वी... स्पर्श... गंध... रस... श्रुति... दृष्टि... सारं... सारं कांहीं असून नसल्यासारखं झालं होतं... जीवनाची वेस मरणाच्या वेशीला येऊन भिडली होती... प्रकाश प्रकाश राहिला नव्हता... अंधार आंधळा झाला होता... नव्हतीं स्वप्नं... नव्हत्या कल्पना... नव्हते भास... नव्हते विचार... पोकळीलाहि अस्तित्व राहिलं नव्हतं... शून्य शून्यांत विरून गेलं होतं... प्रकाशाचं पांघरूण घेऊन अंधाराच्या पाकळ्यांवर तो पहुडला होता. जाणीवांच्या हिंदोळ्यावर बसून तो सूर्यचंद्राशीं गोष्टी करीत होता नि नेणीवांच्या पंखांवर आरूढ होऊन तो पाताळाच्या राजाला कुर्निसात देत होता. " असा परिच्छेद वाचल्यावर आपण क्षणभर थांबून स्वतःला विचारतोंच कीं हें गद्य कीं काव्य ?

एकप्रकारचें अबोल, जीव गुदमरवून टाकणारें दुःख हा रेगे यांच्या अनेक कथांचा स्थायीभाव आहे. हें दुःख नियतीनें व माणसांनीं माणसांना दिलेलें दुःख आहे. हें दुःख स्त्रीचें आहे, तसें हें पुरुषाचें आहे, तसेंच लहान मुलांचेंहि आहे. परिस्थितीनें निर्माण केलेल्या मुलांच्या मूक दुःखाला रेगे बोलकें करितात. ज्या दुःखाचें रेगे चित्र काढतात तें हळूहळू पडणाऱ्या अंधारासारखें गडद आणि व्यापक असतें. त्यांच्या बहुसंख्य लघुकथांतील स्त्री-पुरुष आणि मुलं ह्या कोठल्या ना कोठल्यातरी मोठ्या दुःखाच्या भाराखालीं वांकलीं आहेत असें वाटतें. तीं बरींचशीं अबोल असतात : आपल्या दुःखाबद्दल बोललेलें त्यांना फारसें आवडत नाहीं; त्यांच्या हालचालींतून, त्यांच्या तोंडून क्वचित् निघणाऱ्या शब्दांतून—पण त्याहिपेक्षां अधिक म्हणजे त्यांच्या निःशब्द स्तब्धतेतून तें पुष्कळदां व्यक्त होतें. निसर्गहि ह्या दुःखांत सहभागी असतो, साक्षी असतो, क्वचित् ह्या दुःखाची भीषणता वाढवीत असतो; आणि म्हणूनच रेगे त्याचीहि मदत ह्या दुःखाच्या सूचक अभिव्यक्तीसाठीं एकसारखी घेत असतात.

रेगे यांना लोकविलक्षणाचें (Supernatural) आकर्षण आहे : कोंकणच्या जीवनाशीं एकजीव झालेल्या भुताखेतांच्या गोष्टी सांगण्यांत ते मोठे पटाईत आहेत. ह्या गोष्टींना साजेसें भीषण आणि अद्भुत वातावरण ते सहज निर्माण करूं शकतात; परंतु मौज अशी कीं ह्या गोष्टींचा आत्माहि दुःखच आहे. व्यक्तिमनाला ग्रासून टाकणाऱ्या कोठल्या तरी अबोल दुःखाची आणि लोकविलक्षणाची ते बेमालूम सांधेजोड करूं शकतात. त्यांच्यामध्यें एक प्रकारचा अपरिहार्य भावसंबंध ते निर्माण करूं शकतात. त्यामुळें तीं जवळ जवळ येतात आणि परस्परांच्या हातांत हात घालून त्यांच्या गोष्टींतून वावरूं लागतात. काळोख, मृत्यु, अमावास्या ह्या रेगे यांच्या कथांत वरचेवर येणाऱ्या गोष्टींना येथेंहि आपोआपच स्थान मिळतें. भुताखेतांच्या कथा असूनहि त्या वाचतांना आपण केवळ रहस्यमय कथा वाचीत आहोंत असा क्षणभरहि भास होत नाहीं. आपण मानवी दुःखांच्या हृदय पिळवटून टाकणाऱ्या गोष्टी वाचीत आहोंत असेंच एकसारखें वाटतें. लोकविलक्षणाचा अशा रीतीनें कथालेखनासाठीं उपयोग करतांना फारच थोडे लेखक आढळतात.

ह्या लोकविलक्षणाबरोबर रेगे आपल्या कांहीं लघुकथांसाठीं रम्याद्भुततेला जन्म देणाऱ्या कल्पकतेचाहि (fantasy) उपयोग करितांना आढळतात. अशावेळीं त्यांची कथा कल्पकतेच्या एका रम्याद्भुत पातळीवर रहाण्याचा प्रयत्न करिते. 'कोण रडतं आहे?' हा अशाच प्रकारचा एक प्रयत्न आहे. तो थोडासा असफल झाला आहे : वास्तव आणि कल्पना यांच्या सीमारेषा त्यांत तितक्याशा एकमेकांत मिळून गेलेल्या नाहींत; परंतु लक्षांत रहाण्याजोगी गोष्ट अशी कीं ह्याहि कथेचा भावविषय मृत्यु आणि दुःख हाच आहे.

कारकुनाच्या—विशेषतः मुंबईतील कारकुनाच्या जीवनावर, त्याच्या यांत्रिक, नीरस दैनंदिनीवर त्यांच्या अनेक कथा आधारलेल्या आहेत. ह्या कथा कारकुनी जगाचें व मनाचें चित्रण करितात; हें जग आणि हें मन रेगे यांच्या चांगलेंच परिचयाचें आहे : त्यांतील हेवेदावे, टीचभर आकांक्षा, आशानिराशा, मानापमान, ऊनपाऊस, दौर्बल्य आणि औदार्य यासंबंधींचें रेगे यांचें अवलोकन अत्यंत सूक्ष्म आणि मार्मिक आहे. कारकून हा रेगे यांच्या अखंड अवलोकनाचा विषय बनला आहे. परंतु कारकुनावर रोखलेल्या रेगे यांच्या दृष्टींत केवळ

सहानुभूति नाहीं, दुबळ्या ओलाव्याचा अंशहि नाहीं; एक प्रकारची भेदकता आहे. त्यांच्या कारकून-कथांतून कारकुनी जीवनांतील दुःख व कारुण्य तर व्यक्त होतेंच; परंतु त्याबरोबरच त्याची लाचारी, दुबळीक, त्याचें नैतिक अधःपतन, त्याचा स्वत्वसंकोच ह्यांचेंहि भेदक दर्शन घडतें. 'कचकडं' ही कथा वाचतांना रेगे ह्यांच्या वृत्तींतील हा उपरोध, ही भेदकता विशेषच जाणवते. त्यांच्या कथांतून प्रकट होणारा कारकून हा आपल्या सहानुभूतीचा विषय होतो, नाहीं असें नाहीं; परंतु त्याच्या जीवनांतील कारुण्याबरोबरच परिस्थितीनें किडलेलें त्याचें मनहि ह्या कथांतून प्रतिबिंबित होतांना दिसतें व मग त्याची आपणांस कींव करावीशी वाटते. मला वाटतें, रेगे यांच्या दृष्टीनें त्याच्या जीवनाची खरीखुरी शोकात्मिका ह्यांतच आहे.

गतवर्षीच्या 'साधने'च्या दिवाळी अंकांत प्रसिद्ध झालेल्या सदानंद रेगे यांच्या 'पाळणा' ह्या कथेनें त्यांच्या कुतूहलविश्वाचें एक वेगळेंच दालन खुलें केलें आहे. येशू ख्रिस्ताच्या करुणोदात्त कहाणींतील दुःख हा रेगे यांच्या चिंतनाचा आतां विषय झाला आहे; व त्यांतून ही उदासरम्य कथा जन्माला आली आहे. तिच्यांतील दुःख रेगे यांच्या इतर कथांतील दुःखासारखेंच अबोल, उत्कट आहे. त्याची व्याप्ति मात्र विशाल आहे. त्यानें निर्माण केलेलें वातावरण वाचणारालाहि अबोल व निःशब्द करील असें आहे : दुःख आणि सुख, मृत्यु आणि जन्म, अंधार आणि प्रकाश, द्वेष आणि प्रेम ह्या सर्वांचें एकदम दर्शन घडविण्याचें सामर्थ्य ह्या कथेंत आहे. येशू ख्रिस्ताच्या कहाणीचा रेगे यांच्या संवेदनक्षम मनावर फार खोलवर परिणाम झाला आहे. त्यांचें भावजीवि मन ह्या कहाणीमुळें जणुं थरारून गेलें आहे. ह्या कथेची भाषाहि अगदीं सहजगत्या बायबलमधील भाषेची आठवण करून देते : तेंच अल्पाक्षरत्व, तीच सूचकता, तोच अर्थपूर्ण साधेपणा, तीच पद्याचा भास उत्पन्न करणारी तालबद्धता तिच्यांत अवतरली आहे. मला वाटतें, ही मराठींतील अशा प्रकारची पहिलीच कथा असावी. रेगे यांच्या अलीकडील कित्येक कोमल भावकवितांचा जन्महि मानवतेसाठीं मरण पत्करणाऱ्या महापुरुषाच्या ह्याच बायबलमधील कहाणीच्या चिंतनांतून झाला आहे. रेगे यांच्या ह्या भावकविता आणि ही कथा ह्यांचें एकमेकांशीं फार जवळचें नातें आहे. पुढें मागें रेगे प्रसिद्ध स्वीडिश कथालेखक

पार लेजरक्विस्ट याच्या 'बाराब्बस' सारखी एखादी प्रदीर्घ कथा लिहितील अशी अपेक्षा आहे.

लोकविलक्षणाचें आकर्षण, स्वप्नसदृश कल्पनाविश्व निर्माण करण्याची शक्ति ह्याबरोबरच रेगे यांच्या प्रतिभेंत एक मिस्किलपणाची छटा आहे. ही मिस्किलवृत्ति जशी कांहीं वेळां त्यांच्या 'किंचित् काव्यां'तून, त्यांच्या लघुतर कथांतून (सत्यकथा : दिवाळी अंक १९५३) व्यक्त होते तशीच परंतु अगदीं वेगळ्या मोहक स्वरूपांत त्यांच्या 'माझ्या बापा' संबंधींच्या कथांतून व्यक्त होते. ह्या कथा वाचतांना मला नेहमीं विल्यम सारोयानच्या 'माय नेम इज ॲरॅम' आणि एच. ई. बेटस्च्या 'माय अंकल सिलास' ह्या दोन कथासंग्रहांतील गोष्टींची आठवण झाली आहे. रेगे अशा प्रकारच्या आणखी किती गोष्टी लिहिणार—नव्हे, सांगणार आहेत (ह्या गोष्टींतली सगळी मौज सांगण्यांतलीच आहे), कोणास ठाऊक! ह्यां संग्रहांत त्यांतील फक्त दोनच कथा वानगीदाखल घेण्यांत आल्या आहेत; परंतु त्यांचें स्वरूप मोठें मजेदार आहे: एक प्रकारच्या विक्षिप्तपणाची झांक त्यांत आहे; उत्तम व्यंगचित्राची, सायंकाळच्या निवांत वेळीं करावयाच्या शिळोप्याच्या गप्पांची, आणि एक प्रकारच्या बालसुलभ बेछूटपणाची संमिश्र मौज त्यांत आहे. परंतु त्यांची सगळी गोडी यांतच आहे असें नाहीं: त्यांचा आणखी एक विशेष आहे कीं ज्यामुळें ह्याहि कथा रेगे यांच्या इतर कथांशीं संलग्न झाल्या आहेत. विक्षिप्तपणा आणि तज्जन्य विनोद त्यांत आहे हें जसें खरें तसेंच त्या विक्षिप्त गरिबांच्या गोष्टी आहेत, त्यांच्या सुखदुःखांच्या गोष्टी आहेत, हेंहि तितकेंच खरें: त्यांच्या विशिष्ट मिस्किल निवेदनांतहि ज्या व्यक्तींच्या जीवनांतील त्या गोष्टी आहेत त्या व्यक्तींच्या वांट्याला आलेलें दुःख सूचित करण्याची शक्ति आहे. त्यांत देखील कारुण्याचा एक अस्पष्ट सूर सर्वत्र ऐकूं येत आहे. मला वाटतें, ह्यामुळेंच त्या कथांचें एवढें आकर्षण आपणांस वाटत असावें.

ह्या कथासंग्रहाच्या पाठोपाठ रेगे यांच्या लघुकथांचा आणखी एक संग्रह प्रसिद्ध होणें अत्यावश्यक आहे. त्यांच्या विपुल कथालेखनाचें सामर्थ्य व समग्र स्वरूप त्याशिवाय नीटसें लक्षांत येणें कठिण आहे. प्रारंभींच सूचित

केल्याप्रमाणें त्यांच्या कथालेखनाचा आलेख बराच उंचसखल आहे; परंतु त्यांतील उंचवटे खूपच उंच आहेत. त्यांनीं सूचित होणारें यश सर्वसामान्य नाहीं : त्यांत त्यांच्या प्रतिभेनें वेळोवेळीं घेतलेली उत्तुंग झेंप व्यक्त झाली आहे. आजच्या मराठी लघुकथेला रंगदार व ढंगदार करण्याला ज्यांचे प्रयत्न विशेषेंकरून कारण झाले आहेत त्यांत सदानंद रेगे यांना मानाचें स्थान आहे. त्यांची प्रतिभा बहुप्रसवा आहे, प्रयोगक्षमता हा तिचा धर्म आहे, उत्साह तिच्या नसानसांतून खेळतो आहे; परंतु ती थोडी अस्थिर आहे, चांचल्य हा तिला मिळालेला शाप आहे. रेगे ह्या प्रतिभेकडून कोणत्या प्रकारचें कार्य करून घेतात ह्याकडे आज रसिकांचे डोळे लागलेले आहेत. आतां ही प्रतिभा दिवसेंदिवस प्रौढ बनणार आहे. 'पाळणा' ह्या कथेनें तिनें कांहीं नवीन अपेक्षा निर्माण केल्या आहेत. ह्या अपेक्षा कितपत सफल होतात तें पहावयाचें.

**वा. ल. कुळकर्णी**

: १ :

# काळोखाचीं पिसें

किरमिजी रंगाची गोजिरवाणी संध्याकाळ सुलूला फसवून निघून गेली नि काळ्या कुळकुळीत पांघरुणांत गुडुप करून बसलेली रात्रीची चटकीण फिदीफिदी हंसत येऊन पिंगा घालूं लागली. झाडांवरचीं पपनसं तिच्याकडे टवकारून पहात होतीं. शिंकाळ्यांतले कांदेबटाटे घाबरून एकमेकांना बिलगले होते.

इतक्यांत भाऊंना पहायला डॉक्टर आले. शंकरकाका ओटीवर त्यांचीच वाट पहात उभे होते. शंकरकाकांच्या कानाशीं लागून डॉक्टरांनीं कांहींतरी विचारलं नि ते तसेच माजघरांत आले. माजघरांत उजवीकडच्या खिडकीखालीं भाऊंची कॉट होती. तीवर भाऊ निजले होते. त्यांची छाती नि पोट एकसारखं खालींवर होत होतं. त्यांच्या घशांतून, डबक्यांत पाणी चुबकतं तसा आवाज येत होता. आत्या, नमूताई, विमल, बाळू, वरच्या वहिनींचा त्र्यंबक, शंकरकाका...सारींजणं त्यांच्याभोंवतीं जमलीं होतीं. कुणी कुणाशीं बोलत नव्हतं. कुणी कुणाकडे पहातहि नव्हतं. मास्तर खूप संतापल्यावर वर्गांत जशी शांतता असते तसं कांहींतरी चमत्कारिक वाटत होतं. भाऊंच्या नाकांत एक नळी घातली होती नि ती जवळच उभ्या करून ठेवलेल्या एका नळकांड्याला लावून ठेवली होती. भाऊंचं मनगट हातांत धरलेले डॉक्टर आपल्या मनगटा-वरील घड्याळाकडे सारखे टक लावून पहात होते. सगळ्यांच्या कपाळांवर आंठ्या चढल्या होत्या. भरती संपल्यानंतर किनाऱ्यावरच्या भुसभुशीत वाळूंत लाटांचे व्रण उठतात तशा.

इतक्यांत घड्याळाच्या पोटांत कसली तरी गुरगुर झाली नि सारख्या अंतरानं आठ ठोके पडले— टिक्... टिक्... टणांग... टिंग... घड्याळाचा पितळी लंबक, अंगणांत पिंगा घालणाऱ्या रात्रीच्या चेटकिणीला खूण करून घरांत बोलावीत होता. खुराड्यांतल्या कबुतरासारखी ती अंगणांत घुमत होती. मघांपासून तिच्या अंगांत आलं होतं. बागेतील गुलाबांचीं फुलं तिनं खाऊन टाकलीं होतीं. झाडावरचीं कचीं सिताफळं–पपनसं यांचा फन्ना उडविला होता नि भाऊ झोंपले होते त्या खिडकीसमोर उभी राहून ती 'ही ही ही' करून हंसत होती.

थोड्या वेळानं डॉक्टरांनीं भाऊंचं मनगट सोडलं नि शंकरकाकांकडे पाहून ते इंग्रजींत कांहींतरी म्हणाले. आत्या, नमूताई, आई यांना त्यांतलं कांहीं कळलं नाहीं. शंकरकाकांनीं डॉक्टरांकडे हताशपणानं पाहिलं नि धोतराचा सोगा नाकाच्या बोंडाला लावून सुसकारत, ते जायला निघालेल्या डॉक्टरांबरोबर फाटकापर्यंत गेले.

डॉक्टर निघून गेल्यावर शंकरकाका आंत आले नि विमलकडे पाहून म्हणाले, 'चला रे पोरांनो, जेवून घ्या पटापट.' आत्या, नमूताई, आई, भाऊंच्याजवळच राहिलीं. विमल, सुलू, त्र्यंबक, बाळू, जेवायला आंत निघून गेलीं.

मग शेजारच्या बंगल्यांतले नानासाहेब वैद्य आले...नंतर भाऊंच्या हपिसांतले चारपांच जण...मग तात्या बेलवलकर, रघुनाथराव बळवल्ली... भैयासाहेब...कितीतरी माणसं आलीं.

घड्याळाच्या पोटांत पुन्हां गुरगुरलं नि त्याच्या पोटांत लपून बसलेलीं रबरी कुत्रीं नऊ वेळां भुंकलीं.

खिडकीसमोरच्या जांभळीणीखालीं उभी असलेली काळ्या बुरख्यांतली चेटकीण जोरानं किंचाळूं लागली. मग थोडा वेळ शांऽत झालं. बागेतलीं झाडं थोडीशीं सळसळलीं. फाटक क्षणभर करकरलं. लांबून कुठूनतरी इंजिनाची कर्कश शीळ ऐकूं आली.

मुलांचीं जेवणं झालीं तरी मोठीं माणसं जेवायला आलीं नाहींत. निलगिरी तेलाचा वास...टर्पेंटाइनचा वास...इंजेक्शनच्या टोंकेरी सुया...ई ऽ ऽ ऽ...त्या

ठेवायच्या चकचकीत डब्या...औषधांच्या बाटल्या...त्यांवरचीं तांबडीं, हिरवीं, पिवळीं लेबलं...त्यांवरची षट्कोनांची रांग...ती रबरी नळी...ती जवळच उभी ठेवलेली नळकांडी...भाऊंचं मनगट हातांत घेऊन विचार करीत रहाणारे डॉक्टर...भाऊंचा हात सोडून कपाळावर आंठ्या आणणारे डॉक्टर...शंकरमामांच्या कानांत कुजबुजणारे डॉक्टर—नि बुटांचा टॉक् टॉक् आवाज करीत एकदम निघून जाणारे डॉक्टर...डॉक्टर...डॉक्...शी ऽ ऽ मघाशीं भाऊ ओकले...अंथरुणांतच...तांबडं तांबडं. मग सगळे लोक घाबरले. आई रडूं लागली. आत्यानं डोळ्याला पदर लावला. संध्याकाळ झाली. मिणमिण दिवे काळोखाच्या नदींतून तरंगूं लागले...रात्रीची चेटकीण अंगणांत येऊन पिंगा घालूं लागली. नि मग डॉक्टर आले—डॉक्टर आले. शंकरकाका म्हणाले, 'मुलांनो, पटापट जेवून घ्या.' नाहीं घेत.—पटापट कां म्हणून...कां म्हणून...भाऊंना उठवा. त्यांना जेवायला घेऊन चला. शेगटाच्या शेंगांची सकाळची आमटी झकास झाली आहे...भाऊंची आवडती...ही...ही माझी वाटी घ्या...भाऊंना खाऊन घेऊं दे.

सुलूच्या डोळ्यांवर झोंप हिंदोळूं लागली. बाहेर जांभळीणीखालीं उभी असलेली चेटकीण दांत काढून हंसली नि सुलूकडे पाहून हातवारे करूं लागली. हळूहळू काळोखाचीं पिसं आंत आलीं नि त्यांची मखमल सुलूच्या डोळ्यांवरून फिरली. सुलूच्या डोळ्यांचीं कमळं त्या जादूनं मिटलीं...मग...सारा काळोख...काळोख झाला...भाऊंची आमटी तशीच राहिली...

हळूहळू काळोखाची नदी फुगूं लागली. काळोखाचा गलेलठ्ठ प्रचंड अजगर सैरावैरा पळूं लागला. काळोखाचीं पिसं दिशांदिशांतून भुरभुरूं लागलीं.

रात्रीं दोनच्या सुमारास सुलूला अस्पष्टशी जाग आली तेव्हां घरांत सगळी रडारड चालली होती. सगळे दिवे मालवले होते. माजघराचा दरवाजा बंद करण्यांत आला होता. आई ढसढसां रडत होती. आत्याला फीट आली होती. विमल गुडघ्यांत मान घालून बसली होती. अन् एकटा त्र्यंबक या साऱ्यांची समजूत काढीत होता. सुलू उठलेली पहातांच तो पट्कन् तिच्याजवळ आला नि तिला थोपटतांथोपटतां म्हणाला, "सुलू, तूं नीज पाहूं."

सुलू क्षणभर बावरल्यासारखी झाली. कसल्यातरी प्रचंड शक्तीच्या झोतच्या झोतच आपल्या अंगावर कोसळतो आहे याची मुकी जाणीव तिला झाली. तिला सारं समजून चुकलं, पण उमगलं मात्र कांहीं नाहीं. तिचे डोळे पेंगत होते. काळोखाचीं पिसं तिच्या डोळ्यांना भुरळ घालून मिटवीत होतीं...

जागं रहाण्याचा प्रयत्न करतांकरतां सुलूचा पुन्हां डोळा लागला. पण मिटल्या डोळ्यांनीं ती पाहूं लागली. कान टवकारून ऐकूं लागली.

अंगणांत बरेच लोक जमल्यासारखं वाटलं. घंगाळाचा आवाज आला. कुणीतरी घागरी भरून पाणी ओतल्याचा आवाज आला. कसली तरी खडबड... कुजबुज...पुटपुटणं...करकरणं...मध्येंच कुणीतरी बोलल्यासारखं वाटे नि त्यांत ही रडारड...पुन्हां काळोखाचीं पिसं आलीं नि तिच्या डोळ्यांचीं कमळं मिटवून गेलीं. जांभळीणीखालची ती रात्रीची चेटकीण एव्हांना कुठं तरी पळून गेली होती...अधूनमधून इंजिनाची शीळ मात्र वाऱ्याच्या जहाजावर बसून काळोखाच्या समुद्रावर फिरत होती.

हळूहळू अंधार विरूं लागला. पूर्वेला तांबडं फुटलं. नानासाहेब वैद्यांचा वाघ्या कुणाच्या तरी अंगावर जोरजोरानं गुरगुरला. सुलूच्या डोळ्यांच्या पाकळ्या किंचित् उघडल्या. बाहेर पसरत चाललेला प्रकाश त्यांना दिसला. माजघराच बंद दरवाजा त्यांनीं पाहिला. रडून रडून दमलेलीं नि पहांटेच्या गार वाऱ्यानं फसविलेलीं माणसं त्यांनीं न्याहाळलीं. अंथरुणावर पडल्यापडल्याच ते आदल्या रात्रीची चाहूल घेऊं लागले.

या वेळेला काळोखाचीं पिसं आलीं नाहींत. पडल्यापडल्याच ती कसला तरी विचार करूं लागली. थोड्या वेळानं ती उठून बसली तेव्हां बाहेर पांढरं फटफटीत झालं होतं.

सुलूनं नळावर जाऊन तोंड धुतलं. बाळू नि त्र्यंबक बांधावर बसून आपापसांत कांहींतरी कुजबुजत होते. शंकरकाका मात्र कुठं दिसत नव्हते.

मग विमलनं तिला कपडे काढायला सांगितले नि कोमट पाण्याची आंघोळ घातली. सकाळचा गार वारा आला. त्यानं सुलूचं अंग शहारलं...पण वेगळंच शहारलं...रोजच्यापेक्षां कितीतरी निराळं...उदास...विमनस्क.

आंघोळ करून ती घरांत आली. मुकाट्यानं तिनं आपले कपडे घातले नि ती पुढच्या अंगणांत आली.

पायरीवरचं घंगाळ अजून तसंच होतं. सगळ्या पायऱ्या ओल्या झाल्या होत्या. दुसऱ्या पायरीवर एक पाट होता. खळ्यांत कामट्यांचे लहान लहान तुकडे पडले होते. अधूनमधून गुलाल सांडला होता. सुंभाचे तुकडे विखुरले होते.

या साऱ्याकडे तिनं पाहिलं नि ती विचार करूं लागली. इतक्यांत तिचं लक्ष माजघरांतल्या भाऊंच्या कॉटकडे गेलं. कॉट होती, पण भाऊ नव्हते. तिला हें सारं रात्रींच कळलं होतं. पण आतां तें प्रत्यक्ष जाणवत होतं...ही...ही भाऊंची कॉट... त्यापलिकडे ती खिडकी...पलिकडे तें जांभळीणीचं झाड... त्याच्याखालीं उभी असलेली...ती...ती...

कशाबशा ती पायऱ्या उतरते नि नानासाहेबांच्या अंगणांत जाते. नानासाहेब घरांत दिसत नाहींत. पण त्यांचा मधू, बंड्या, गोपू, बेबी, पमा खळ्यांत बसून कवड्यांचा डाव खेळत आहेत. सुलूला पाहतांच तीं एकदम गप्प होतात नि तिच्याकडे टवकारून पाहूं लागतात.

सुलूला तें कससंच वाटतं.

इतक्यांत त्या मुलांची आई दारांतूनच तिला पहाते नि अंगणांत येऊन तिच्या पाठीवरून हात फिरवते.

‘ चला रे, चहा नाहीं का घ्यायचा तुम्हांला ? ’

सगळीं मुलं उठतात, नानासाहेबांच्या अक्का सुलूलाहि हात धरून आंत नेतात नि चहा देतात.

‘ ऐकलंत का रे ? या सुलूलाहि घ्या तुमच्यांत खेळायला. ’ पुन्हा तीं सगळीं मुलं सुलूकडे केविलवाण्या नजरेनं पाहूं लागतात.

सुलूला तें कससंच वाटतं.

चहा पितां पितां आपण पोरके झालों आहोंत हें तिच्या अंधुक अंधुक लक्षांत येतं. नजरेसमोर एकदम कसली तरी पोकळी निर्माण होते. काळोखाचीं पिसं पिंगा घालूं लागतात. एकदम ती चहा प्यायची थांबते नि रडूं लागते.

१९५०

* * *

: २ :

# खूण

कितीवेळ बागेंतील त्या ओलसर हिरवळीवर तो डोळे मिटून पडला होता कुणास ठाऊक! त्याचं त्यालाहि तें ठाऊक नव्हतं. दिवेलागणीच्या सुमारास सबंध पार्क माणसांनीं डंवरून गेलं होतं तेव्हां कधीं तरी तो आला असावा. पार्कच्या हिरवळीवर क्षणभर उभं राहून त्यानं आजूबाजूला पाहिल्यासारखं केलं नि थोडावेळ तिथंच तो सुन्न होऊन उभा राहिला. डोळ्यांनीं तो कांहींतरी पहात होता पण दिसत मात्र त्याला कांहीं नव्हतं. कानांनीं तो कांहींतरी ऐकत होता पण ऐकतां मात्र त्याला कांहीं येत नव्हतं. कुणी भेळ खात होते. कुणी गंडेरीवाल्याशीं हुज्जत घालीत होते. कुणी दाटत चाललेल्या काळोखाच्या उशीवर डोकं टेकून प्रियकरणीशीं कानगोष्टी करीत होते. कुणी हवापाण्याच्या गोष्टी करीत होते. कुणी राजकारणाच्या फडक्यानं तोंडाला आलेली तांब पुसून टाकीत होते. कुणी पोराबाळांशी खेळत होते. कुणी त्यांच्या पाठींत धपाटे घालीत होते. पार्कच्या मध्यभागीं असलेल्या संगमरवरी चौथऱ्यांवर बसून कुणी गवई लोकांची करमणूक करीत होता. रस्त्यांवरून जाणाऱ्या मोटारी...फ्लूरोसंटचे लखलखणारे दिवे...सिगारेट...चिरूट... विड्या...यांचा वातावरणांत भरून राहिलेला दर्प...मधूनच येणारी एखादी गार वाऱ्याची झुळूक...घराघरांतून किंचाळणारे रेडिओ...मारामाऱ्या...भांडणं... कुजबुजणाऱ्या कानगोष्टी...वादविवाद...आर्ग्युमेंटस्...हळू हळू...हळू हळू... मांजरपावलांनीं हें सारं अस्पष्ट होत गेलं...ओल्या तावदानांतून मुसळधार पावसांत

भिजून ओलीचिंब झालेली पृथ्वी दिसावी तसं दिसूं लागलं...जाणीवा झडून पडूं लागल्या...संवेदना वितळत चालल्यासारखं वाटूं लागलं...आभाळाच्या गालावर टिचकी मारून जमिनीच्या दिशेनं सूर मारतांना, झोपाळ्यावर बसलेल्याच्या अंगांत येते तशी शिरशिरी त्याच्या नसानसांतून लहरत गेली. निद्रा आणि जागृति यांच्या वेशीवर, कुठल्या तरी अज्ञात प्रदेशांत तो वणवणत होता. कांहीं समजत नव्हतं...जाणवत नव्हतं...आठवत नव्हतं...डोळे आंत आंत ओढल्यासारखे वाटत होते...कान दब्ब झाले होते...खारट...तुरट लाळेचा ओढा खरखरीत जिभेखालून झुळझुळत होता. आंतडीं चक्राकार फिरूं लागलीं होतीं...पण आपल्याला असं कांहीं होत आहे हेंहि समजण्याच्या अवस्थेंत तो नव्हता.

त्याला वर्तमान आकलत नव्हतं...भूत स्मरत नव्हतं...पावलोपावलीं...क्षणोक्षणीं...प्रत्येक श्वास घेतांना...प्रत्येक निःश्वास सोडतांना...त्याला असं वाटत होतं कीं...कीं विस्मृतीच्या एका गगनचुंबी...अवाढव्य...विराट लाटेनं आपल्याला आपल्या कवेंत घेतलं आहे नि कुणीतरी आपल्या पायाखालची जमीन ओढतं आहे...कसल्यातरी चमत्कारिक...जगावेगळ्या...विलक्षण ग्लानीचा एक नितळ तवंग त्याच्या मनावर चढला होता...सारखं...सारखं...तो स्वतःला विचारीत होता...मी कोण?...कुठला?...इथं आलों कशाला?...आलों कुठून?...

कां ऽऽ हीं नाहीं...एक कोरा करकरीत कागद त्याच्या डोळ्यांसमोर फडफडल्यासारखा वाटे...क्षणभर दांत विचकून तो त्याच्याकडे पाही नि फिदीफिदी हंसे...मग कुठूनतरी एक काळा कुळकुळीत वादळी वाऱ्याचा लोंढा तिथं घोंगावत येई नि त्याच्या पंखावर बसून तो कोरा कागद कुठं दिसेनासा होई...

मी...मी कोण? ...कुठला? ...कुठला? ...इथं आलों कशाला? ...

थोडा वेळ तो तिथंच हिरवळीवर बसला.

समोर सुरूच्या झाडाखालीं एक बांक होतं त्यावर बसलेलं एक जोडपं एकमेकांच्या अंगाला अगदीं खेटून बसलं होतं नि लुसलुशीत कानगोष्टी करीत होतं. अंधाराच्या कवचाखालीं लपून त्यांनीं चालविलेले चाळे, कांहीं वेळ शून्य

नजरेनं तो पहात बसला. अधूनमधून स्वतःला नकळत तो स्वतःशींच अवखळ-पणानं हंसत होता नि हातवारे करीत कांहींतरी पुटपुटत होता.

इतक्यांत एक फूटबॉलच्या आकाराएवढा रंगीत रबरी चेंडू दुडदुडत तो बसला होता तिथं आला नि त्याच्याकडे आश्चर्यचकित नजरेनं पाहूं लागला. त्यानं मनांतल्या मनांत त्या चेंडूला विचारलं, 'काय, कसं काय आहे?' त्यावर तो कांहींच बोलला नाहीं. त्याच्याकडे पाहून तो एकदां खुदूकन् हंसला मात्र.

पाठोपाठ गुबगुबीत सशासारखा एक गोंडस छोकरा पळत पळत तिथं आला नि त्याला पहातांच कावराबावरा होऊन जागच्याजागींच थबकला.

त्यानं तो चेंडू उचलला नि मनांतल्यामनांत त्या मुलाला विचारलं, 'चेंडू हवा ना तुला? मग ये कीं असा जवळ...'

पण तो तिथंच उभा होता.

'नको चेंडू तुला?'

'उंहूं ऽऽ'

'नको?'

'हवा'

'मग?'

'उंहूं..'

त्यानं अलगद तो चेंडू त्याच्याकडे फेंकला नि त्याच्या सारखंच निरागस तो हंसला.

अन् मग हळू हळू आजूबाजूची गर्दी विरत चालल्यासारखी वाटूं लागली. अंधार वाढूं लागला. आवाजांचा गुंतवळा सुटूं लागला.

कधींतरी...त्याला नकळतच तो त्या ओलसर हिरवळीवर आडवा झाला.

कधींतरी...त्याला नकळतच त्याचा डोळा लागला!

जाग्रति...निद्रा...संवेदना...भावना...जाणीवा...नेणीवा...तेज... वायु...आप...पृथ्वी...स्पर्श...गंध...रस...श्रुति...दृष्टि...सारं...सारं कांहीं

असून नसल्यासारखं झालं होतं...जीवनाची वेस मरणाच्या वेशीला येऊन भिडली होती...प्रकाश प्रकाश राहिला नव्हता...अंधार आंधळा झाला होता... नव्हतीं स्वप्नं...नव्हत्या कल्पना...नव्हते भास...नव्हते विचार...पोकळीलाहि अस्तित्व राहिलं नव्हतं...शून्य शून्यांत विरून गेलं होतं...प्रकाशाचं पांघरूण घेऊन अंधाराच्या पाकळ्यांवर तो पहुडला होता. जाणीवांच्या हिंदोळ्यावर बसून तो सूर्यचंद्राशीं गोष्टी करीत होता नि नेणीवांच्या पंखावर आरूढ होऊन तो पाताळाच्या राजाला कुर्निसात देत होता.

असा किती वेळ तो तिथं पडून राहिला होता कुणास ठाऊक! पण बाहेर कुठंतरी अकराचे टोले वाजल्यासारखे वाटले तेव्हां नकळतच त्यानं डोळे उघडले नि आसपासची चाहूल तो घेऊं लागला. आपण एका पार्कमधील हिरवळीवर पडलों आहोंत हेंच त्याच्या लक्षांत यायला कितीतरी वेळ लागला. दृष्टीसमोर रत्नजडित आकाशाचा कमरपट्टा लखलखत होता. पण त्याचं सौंदर्य त्याला जाणवत नव्हतं...दिसत होतं पण कळत नव्हतं...

भंवतालीं नीरव शांतता पसरली होती. झाडं डोलत होतीं पण बोलत नव्हतीं. पांखरं जागीं होतीं पण कुजबुजत नव्हतीं. लांब कुठंतरी...कुणाचातरी रेडिओ लागला होता नि ढगांनीं चांदणं गाळावं तसा अंधार त्या गाण्याचे सुगंधी सूर गाळीत होता. रस्त्यावरून एखाददुसरी मोटार भुर्रकन् जात होती नि पार्कच्या दगडी पायवाटांवर रखवालदार पठाणाचा सोटा कटाव गात होता.

‘ एऽऽ कौन है उधर ? ’

अं ?...कोण ?...कोण बोललं हें ?...कुणाला ?...

‘ ऐऽऽ...चलो सोनेका है तो घर जाव. अब पारक बंद होनेका टैम आगया...उठोऽऽ ’

तो आवाज ऐकतांच, स्वतःला नकळतच तो उठून बसला नि बावरलेल्या नजरेनं आजूबाजूला पाहूं लागला.

कांहीं केल्या...कांहीं केल्या...त्याला कांहीं आठवेनाच.

त्याचं बाहेरचं मन आंतल्या मनाला विचारीत होतं, मी कोण ?... कुठला ? इथं कशाला आलों ?...

अन् आंतलं मन आणखी आंतल्या मनाला प्रश्न करीत होतं...

'एऽऽ सुनता नहीं ?'

लालाच्या काठीचं टोक त्याच्या बरगडींत घुसलं त्याच तिरमिरीसरशीं तो उठून उभा राहिला नि उजव्या हातानं डोकीवरचे केस ओरबाडीत तो वेड्या-सारखा लालाकडे पाहूं लागला.

'क्या, अबभी मगजमें नहीं आया ?'

'उंऽऽ ?'

'चल हट यहाँसे...'

त्याच्या आंतल्या...आंतल्या...आंतल्या मनाला वाटलं, अशीच दांतओंठ खात झडप घ्यावी नि...नि...याच्या नरडीचा घोट घ्यावा...कारून घशाची नळी फोडावी...ऊन...ऊन...रक्त प्यावं.

ऊन...ऊन रक्ताची आठवण होतांच, आपल्या घशाला कोरड पडली आहे याची जाणीव त्याला झाली. त्यानं लालाकडे पुन्हा एकदां रोंखून पाहिलं नि वेड्यासारखा तो भयाण हंसला.

'चल हट...'

'हँ हँ हँ हँऽऽऽ'

अंग चोरल्यासारखं करून त्यानं दोन्ही हात कोटाच्या खिशांत घातले नि दबकत दबकत तो रस्त्यावर आला.

आतां...आतां काय करायचं ?

कोपऱ्यावरच्या दिव्याखालीं खांबाला टेकून एक काळेलासा मनुष्य उभा होता. त्याच्याकडे त्यानं वळून पाहिलं नि थोड्या वेळानं त्याच्या लक्षांत आलं कीं तो सिगारेट ओढीत उभा आहे. एकेक पाऊल कसंबसं टाकीत तो त्याच्या जवळ गेला नि नुसताच त्याच्याकडे पहात उभा राहिला.

'क्या है ?'

तोंडाजवळ बोट नेऊन त्यानं आपल्याला सिगारेट हवी असल्याची खूण केली. दिव्याखालचा तो माणूस त्याच्याकडे पाहून पाचकन् थुंकला नि डोळ्यावर

आलेलीं झुलपं मानेच्या झटक्यासरशीं मागं नेऊन त्यानं लेंग्याच्या खिशांतून सिगारेटचं पाकीट काढलं.

'हां...लो ऽ'

त्याचा पुढं झालेला हात...सिगारेटचं तें उघडं पाकीट...त्यांतला तो चांदीचा कागद.

आपल्याला सिगारेट हवी होती ती पुढ्यांत आली आहे हेंहि किती तरी वेळ त्याच्या लक्षांत येईना.

'काय नको कां?'

'अं ऽऽऽ?'

'शिग्रेट हवीय् ना?'

त्याचा थरथरता हात पुढं झाला. एक सिगारेट काढून त्यानं ती हाताच्या तळव्यावर आपटल्यासारखी केली.

दिव्याखालच्या त्या इसमानं तेवढ्यांत काडी पेटवून त्याच्यापुढं धरलीहि. घाईघाईनं त्यानं ती सिगारेट कशीबशी तोंडांत धरली. शिलगावलेल्या काडीचा प्रकाश क्षणभर त्याच्या चेहऱ्यावर पडला नि कां कुणास ठाऊक दिव्याखालीं उभा असलेला नि आपल्याला मागितल्याबरोबर सिगारेट देणारा हा इसम एकदम दचकून थोडा मागं सरल्यासारखं त्याला वाटलं. सिगारेट पेटवून त्यानं मान वर केली तेव्हां तो इसम आपल्याकडे किलकिल्या नजरेनं पहात राहिला आहे असं त्याला आढळून आलं.

'एवढ्या रात्रीचे काय करतां इथं?'

'अं?'

'काय घरदार नाहीं वाटतं तुम्हाला?

'अं?...हं...'

त्यानं त्याच्या खांद्यावर हात ठेवला नि पुन्हां तो त्याच्याकडे रोखून पाहूं लागला.

बराच वेळ कुणीच कुणाशीं बोललं नाहीं. आपल्याच तंद्रींत तो

सिगारेटचे झुरके मारीत होता नि दिव्याच्या खांबाला टेकून उभा असलेला तो काळेलासा गृहस्थ त्याला बारकाईनं निरखीत होता.

थोड्या वेळानं सिगारेट संपली तशी तो त्याच फूटपाथच्या अंगानं पुढं निघाला नि नाक्यावर आला.

आपल्या मागून मागून कुणीतरी येत आहे असा अस्पष्टसा भास त्याला होत होता, पण मागं वळून पहाण्याचं त्याच्या डोक्यांत येत नव्हतं.

नाक्यापाशीं आल्यावर क्षणभर तो तिथंच उभा राहिला. समोरचं एक हॉटेल त्याला उघडं दिसलं. त्यानं कोटाच्या खिशांत हात घालून आपल्याजवळ किती पैसे आहेत हें पाहिलं नि तसाच तडक तो हॉटेलांत जाऊन बसला.

'एक स्लाईस मस्का और एक चाय...'

अलिकडच्या टेबलापाशीं पांचसहा लोक बसले होते, अन् त्यांतला एकजण मोठ्यानं वर्तमानपत्र वाचीत होता.

'हवा आहे...पोलिसांना हवा आहे...पालघर येथील दत्तात्रय राघो चौगुले नांवाचा इसम आपल्या बायकोचा खून करून फरारी झाला आहे. उंचीला तो पांच फूट सहा इंच असून रंगानं तो सावळाच आहे त्याच्या कपाळावर उजवीकडच्या अंगाला, खोंक पडल्याचा भला मोठा व्रण...'

अन् त्याचं आंतलं...आंतलं...आंतलं...मन एकाएकीं विचारूं लागलं, 'मी...मी कोण ? ...कुठला ? ...इथं कशाला आलों ? ...इथं कशाला आलों ? ...इथं कशाला आलों ? ...

अन् आंत...आंत...आंत...कुठं तरी...कुणाचे तरी शब्द घुमत होते, 'पालघरहून बायकोचा खून करून पळालेला दत्तात्रय राघो चौगुले तर तूं नव्हेस ?'

मी ? ...मी ? ...दत्तात्रय राघो चौगुले ? पालघरहून बायकोचा खून करून पळालेला... ?

असेनहि...कदाचित् असेनहि...

डोळे ताणून तो आपल्या दोन्ही हातांकडे पाहूं लागला. पण छे...त्याला कांहींच आठवत नव्हतं...कांहींच...

चहा पिऊन झाल्यावर तो उठला नि पैसे न देतांच बाहेर जाऊं लागला. पायऱ्या उतरून तो फूटपाथवर आलाहि. तेवढ्यांत हॉटेलांतला एक पोऱ्या धांवत धांवत बाहेर आला नि त्याचा हात पकडून त्यानं त्याला विचारलं, ‘ चायका पैसा दिया क्या ? ’

मग त्याच्या लक्षांत आलं कीं विचाराच्या तंद्रींत आपण पैसे न देतांच बाहेर आलों म्हणून.

तसाच तो मागं वळला नि केविलवाण्या चेहऱ्यानं गल्ल्यावर बसलेल्या इसमाला म्हणाला, ‘ माफ करा, चुकून चहाचे पैसे न देतांच मी बाहेर पडलों...’

त्यानं कोटाच्या आंतल्या खिशांतून एक आणेली काढली नि ती अलगद त्या इसमाच्या हातांत ठेवली.

आणि पुन्हां तो रस्त्यावर आला.

आतां काय करायचं ? ...कुठं जायचं ? ...त्यानं आजूबाजूला नजर फेंकली नि तेवढ्यांतच त्याच्या समोरच्या अंगानं कुणी तरी उजवीकडच्या गल्लींत सटकल्यासारखं त्याला वाटलं...

तो दिव्याजवळचा इसम भेटल्यापासून त्याला राहून राहून असा भास होत होता कीं, कुणी तरी...कुणी तरी आपला मागोवा घेत आहे...कुणी तरी आपल्यावर पाळत ठेवून आहे...

चौक ओलांडून तो टांग्यांच्या स्टँडपर्यंत आला नि तिथंच अंधारांत एका बंद दुकानाच्या पायरीवर बसला. एक टांगेवाला आपल्या घोड्याला थोपटीत होता, दुसरा गवत घालीत होता, तिसरा नाक्यावरच्या एका वेश्येशीं कसली तरी बातचीत करीत होता. कुणी पेंगत होते. कुणी विड्या फुंकीत होते. कुणी गप्पा मारीत होते.

एकजण म्हणत होता, ‘ आजच्या पेप्रांत आलंय...म्हणे एका भिकाऱ्याला डर्बी रेशीचं तिकट लागलं तेरा लाख रुपयांचं. पण त्या भिकारड्याचा कुठं पत्ता न्हाइ अद्याप...’

‘ त्यांना कळलं कसं भिकाऱ्याला बक्षीस लागलं म्हणून ? ’

‘ त्येला ज्येनं तिकट इकलं त्येच्याकड असनारच लिवलेलं...’

त्याच्या कानावर हे शब्द पडले नि त्याचं आंतलं...आंतलं...आंतलं... मन त्याला विचारूं लागलं, 'तो...तो भिकारी तूं तर नसशील ? तेरा लाख रुपये मिळाल्याची बातमी ऐकून तुला स्मृतिभ्रंश झाला असेल...तुला वेड लागलं असेल...'

पुन्हां पुन्हां त्यानं केस ओरबाडले. कपाळावरून हात फिरवला. पुन्हां पुन्हां तोच तो प्रश्न त्यानं स्वतःला विचारला...

पण कांहीं नाहीं...त्याच्या नजरेसमोर नुसता एक कोरा करकरीत कागद तेवढा फडफड करीत होता.

कोटाच्या आंतल्या खिशांत हात घालून त्यानं जवळचे पैसे चांचपल्या-सारखे केले नि समोरच्या फूटपाथवरील पानवाल्याच्या दुकानासमोर येऊन तो उभा राहिला.

'एक पान देना...'

'कैसा ?'

'एक पान...'

'अरे हाँ...लेकीन कैसा ? पूना...देशी...बनारसी...'

'देशी...'

पान करतां करतां पानवाला दुसऱ्या एका गृहस्थाशीं बोलत होता.

'आज सकाळीं आपल्या भवानशेटच्या मयताला गेलों होतों. बेट्यानं चार लाखाची इस्टेट मागं ठेवली आहे. शिवाय तीनचार बिल्डिंगी आहेतच...'

'हें सारं कुणाला मिळणार आतां ?'

'त्यांचा एक भाचा आहे म्हणतात. बाकी जवळचं असं त्यांना कुणी नाहीं. पण तो कुठं आहे कुणास ठाऊक ?...'

'म्हणजे ?'

'लहानपणीं तो शेटजींकडेच रहात होता. पण त्याची वागणूक बरी दिसेना म्हणून त्यांनीं त्याला एक दिवस हांकलून दिला तेव्हांपासून त्याचा कुठं पत्ताच नाहीं.'

अन् हें ऐकतांच पुन्हां त्याचं मन भणभणूं लागलं. आंतल्या आंत... आंतल्याआंत...कुठं तरीं स्मृतींचीं चक्रं फिरूं लागल्यासारखं वाटूं लागलं.

मी...मी...या भवानशेटचा भाचा तर नसेन ?...अं ?...

नसेन ?...असं कसं होईल ?...हो...हो कदाचित् असेनहि. लहानपणीं ...कधीं तरी...संतापाच्या भरांत मी घराबाहेर पडलों असेन नि वणवण भटकत असतांनाच माझी स्मृति गेली असेल...चार लाखांची इस्टेट नि तीन चार बिल्डिंगी...

पानवाल्यानं दिलेलं पान तोंडांत घालून अगदीं सहज म्हणून त्यानं समोरच्या आरशांतील आपल्या प्रतिबिंबावर नजर टाकली....

अन् आपल्यामागंच...जवळ जवळ आपल्या अंगाला खेटूनच कुणी तरी इसम उभा असल्याचं त्याला दिसलं...

झर्रकन मागें वळून त्यानं पाहिलं...तों...

तो दिव्याखालीं भेटलेला...काळेलासा...मानेला झटका देऊन डोळ्यांवरचीं झुलपं मागं नेणारा...

' काय संपलं का पान खाणं ? '

' हो...कां ? '

' नाहीं, आपलं सहज विचारलं...एवढे पालघरहून इथवर आलांत पान खायला... '

' ऑं ? '

' मिस्टर, खून ही चीजच अशी कांहीं और आहे कीं कांहीं विचारूं नका. कधीं ना कधीं ती चहाडी केल्याशिवाय रहातच नाहीं...'

' पालघर ? ...खून ? कुणाचा ? ...मी केला... ? '

अन् एकदम त्या काळेल्या गृहस्थानं आपल्या घट्ट हातानं त्याच्या कोटाची कॉलर पकडली.

' चलाऽऽ '

' कुठं ? '

'चौकीवर'

'कशासाठीं?'

'झोंपायला जागा हवीय ना तुम्हांला? इथं बाहेर राहिलांत तर पोलीस पकडतील.'

'कां म्हणून?'

'खुनी माणसाला कोण रस्त्यावर सुखासुखी झोंपूं देईल काय?'

'कोण खुनी?'

'तेंच सांगतों चौकीवर गेल्यावर.'

'तुम्ही कोण?'

'हा...हा पहा बिल्ला...'

'सी. आय्. डी.?'

'हं...मघापासनं तुमच्यावर पाळत ठेवून होतों ती उगीच नव्हे...'

पानवाला नि जवळच उभा असलेला तो दुसरा गृहस्थ तर हा सारा प्रकार पाहून आश्चर्यचकित झाले होते.

'काय भानगड आहे ही?'

'कांहीं नाहीं, आपल्या बायकोचा खून करून पळालीय स्वारी पालघरहून.'

'हाच तो गृहस्थ हें तुम्ही कसं ओळखलंत?'

'आजच्या पेपरांत वर्णन दिलंय तें वाचा कीं, हें घ्या...'

त्यानं लेंग्याच्या खिशांतून वर्तमानपत्राचं एक कात्रण काढलं नि तें पानवाल्याच्या हातांत दिलं.

'वाचतां येतं कीं नाहीं?'

'येतं कीं'

'मग वाचा कीं!'

हवा आहे...पोलिसांना हवा आहे...पालघर येथील दत्तात्रय राघो चौगुले.....'

पानवाला वाचत होता. त्याच्या मानेवरची गुप्त पोलिसाची ती पकड अधिकाधिक घट्ट होत चालली होती.

नि...समोरच्या आरशांत तो स्वतःचं प्रतिबिंब पहात होता...उंचीला सव्वापांच फुटांच्या वर...सांवळा...डावा डोळा थोडा तिरळा...कपाळावर उजव्वीकडच्या अंगाला खोंक पडल्याचा भला मोठा व्रण...

कुठं तरी...कुणाच्या तरी घड्याळांत बाराचे ठोके पडले नि अजूनपर्यंत उघडीं असलेलीं दुकानंहि बंद होऊं लागलीं.

रात्र डोकीवर आली आहे...सारं जग आतां गाढ झोंपीं जात आहे अन् कपाळावरच्या त्या जखमेच्या खुणेवरून, आपला थरथरता हात फिरवतां फिरवतां तो स्वतःशींच कांहीं तरी पुटपुटतो आहे...

हळू हळू...त्याच्या स्मृतीचा एकेक पापुद्रा उकलूं लागला आहे... पालघर...तें घर...तो सुरा...ती किंकाळी...

१९५२

* * *

: ३ :

# कोण रडतं आहे ?

बाहेर मरणाची थंडी पडली होती. अंगावर दोन दोन रग घेऊनसुद्ध दांतावर दांत वाजायचे थांबत नव्हते. मध्यरात्र उलटायला अजून थोडा अवकाश होता. तरीहि एवढ्यांतच धुकं फुलायला लागलं होतं.

वास्तविक या वेळीं डॉक्टर कधीं जागे असायचे नाहींत. अकरा–साडे-अकरा म्हणजे अगदीं शिकस्त. तसं केल्यावांचून त्यांना गत्यंतर नसे. बाकी माणूस जसजसा मोठा होत जातो तसतसा तो काळाच्या अधिकाधिक आधीन होत असतोच म्हणा. मग त्याच्या साऱ्या हालचाली घड्याळांच्या तबकड्या ठरवूं लागतात. मनगटावर...कोटाच्या खिशांत...दिवाणखान्यांत...स्वैंपाकघरांत... अगदीं सगळीकडे त्याला घड्याळांची आवश्यकता वाटूं लागते. हाताला विलक्षण गुण असलेले सर्जन म्हणून दिवसेंदिवस त्यांची कीर्ति वाढीला लागली होती. अन् आतां, त्यांनीं कितीहि नाहीं म्हटलं तरी ती थोपवून धरणं त्यांच्या आंवाक्याबाहेरचं होऊन बसलं होतं. तशांत अलीकडे मी मी म्हणवणाऱ्या डॉक्टरांनाहि न पेलणारीं तीनचार ऑपरेशनं आपल्या रेशमी हातांनीं त्यांनीं यशस्वीपणें केलीं, तेव्हांपासून कुठून कुठून त्यांच्याकडे रोगी येऊं लागले होते. ‘डॉक्टर, कुणीतरी माझ्या डोक्याच्या आंत बसून हातोड्याचे घाव घालतो आहेसं वाटतं. कराल का माझं ऑपरेशन ?’...‘डॉक्टर, माझ्या पोटांत अल्सर झाल्यासारखा वाटतो आहे. पहातां का जरा पोट उघडून ?’...‘डॉक्टर, आमच्या या मुलानं हजामतीची ब्लेड गिळली आहे होऽऽ...काय करायचं

आतां ?'...' डॉक्टर, ऑपरेशन करून पडशावर कांहीं उपाय करतां येण्या-जोगा नाहीं का हो ?' एक ना दोन...हजारों गांवचे हजार तऱ्हेचे रोगी मोठ्या आशेनं त्यांच्याकडे येत. शक्य असणारे लोक हजारावारी रुपये त्यांच्या पायापाशीं ठेवत. डॉक्टरहि ते मुकाट्यानं उचलीत. रोगी विशेष श्रीमंत असल्यासारखा दिसला तर त्याचं मन वळवून ते लाखालाखाच्या देणग्याहि त्याच्याकडून काढीत. खिशाला ठिगळं लावलेल्या माणसाला ते पैशासंबंधीं एका चकार शब्दानंहि कधीं विचारीत नसत. दिलेत तरी वहावा...नाहीं दिलेत तरी वहावा...त्यांचा हा असा स्वभाव पाहून कांहीं कांहीं लोक विनोदानं म्हणतहि कीं, हा डॉक्टर कांहीं डॉक्टरासारखा वागत नाहीं. तो माणसासारखा वागतो. डॉक्टरांच्या कानावर हें कधीं काळीं जाई तेव्हां ते उगीचच गालांतल्या गालांत हंसल्यासारखं करीत नि पुन्हा गंभीरपणें आपल्या कामाला लागत. पण त्याच वेळीं ते मनांतल्या मनांत म्हणत, ' बाबांनो, माझी आई मेंदूच्या रोगानं हालहाल होऊन मेली नसती तर मी तरी कशाला या डॉक्टरकीकडे वळलों असतों ? माझ्या आईची मरतेसमयींची ती आर्त नजर माझ्या डोळ्यांपुढून हलत नाहीं, म्हणून तर ना मी या शस्त्रक्रियांच्या हत्यारांना हात लावूं लागलों ? तसं नसतं झालं तर दोनशें रुपड्या कमवणारा एखादा कारकुंडाच मी होऊन बसलों असतों कीं ! या साऱ्या खटाटोपांतला माझा असा एवढाच पैसा मी आपला असा मानतों. बाकीचा सारा लोकांचा. लोकांसाठींच वापरावयास म्हणून बाजूला काढलेला. अहोरात्र मरणानं वेढलेल्या या जगाला त्याच्या विळख्यांतून मुक्त करायची खूणगांठ मी माझ्या मनाशीं बांधली आहे. ज्या दिवशीं मरणाच्या कराल दाढेंतून या जगाला मी ओढून काढीन त्याच दिवशीं माझा हा देह चिरविश्रांति घेईल. तोंपर्यंत सारखं काम...काम...काम...'

अन् असं होतं म्हणूनच ते आपखुषीनं घड्याळाच्या स्वाधीन झाले होते. साडेअकराच्या पलीकडे जागायचं नाहीं म्हणजे नाहीं. अंथरुणावर अंग टांकतांक्षणींच त्यांचा डोळ्याला डोळा लागत असे, तो सकाळीं बरोबर साडेचार वाजेपर्यंत.

पण कधीं नव्हतं तें आज त्यांना हॉस्पिटलांतून घरीं यायलाच मुळीं पावणेअकरा वाजले होते. पांच-दहा मिनिटं स्वस्थपणें कोचावर बसून मग ते

जेवायला गेले. जेवणं आटपून ते दिवाणखान्यांत येतात न येतात तोंच त्यांच्या दोस्त घड्याळानं महाराजांची झोंपायची वेळ झाल्याचा पुकारा केला.

आपला लोंकरी ओव्हरकोट अंगावर घेऊन ते क्षणभर कसलं तरी पुस्तक चाळीत बसले.

नकळत तें पुस्तक वाचण्यांत ते इतके रंगून गेले कीं, घरांतलीं सगळीं माणसं झोंपीं जाऊन जिकडेतिकडे सामसूम झाली तरी त्यांना दाद नव्हती. थोड्या वेळानं आपणहूनच ते त्या तंद्रींतून उठले नि एकदम त्यांना कसली तरी आठवण झाली. एकाएकीं त्यांच्या लक्षांत आलं कीं, बाहेर मरणाची थंडी पडली आहे. आपण एवढा गरमागरम ओव्हरकोट अंगावर घेऊन या बंद घरांत बसलों आहोंत तरी गारवा अंगाला बोंचतो आहे. लगेच ते उठले नि खिडकीपाशीं असलेल्या छोट्या टेबलाच्या ड्रॉवरमधून त्यांनीं 'थ्री कॅसलस्' ची बाटली काढून त्यांतल्या नितळ द्रवाचा एक पाईंट जेव्हां घशाखालीं ओतला तेव्हां कुठं त्यांना थोडंसं बरं वाटलं. बाटली पुन्हा ड्रॉवरमध्यें ठेवून त्यांनीं दिवाणखान्यांतला दिवा काढला नि तसेच ते बेडरूमकडे वळले...

किती वेळ झाला तरी त्यांचा डोळ्याला डोळा लागेना. बाहेर मरणाची थंडी पडली होती तशीच त्यांच्या मनांतहि ती पडली होती. जिथं पहावं तिथं मरणाखेरीज दुसरं कांहीं दिसत नव्हतं. असं जर आहे तर मग ही जगण्याची धडपड कशाला? हीं औषधं कशाला? या शस्त्रक्रिया कशाला? अन् हें ...हें...जगणं तरी कशाला?...कशाला? कशाला?...मरणाच्या या गारगार आलिंगनांतून कधींच का कुणाला या विश्वाची सुटका करतां यायची नाहीं?—कधींच का नाहीं?...खरंच?...

मध्येंच त्यांना जाग आली तेव्हां भिंतीवरच्या घड्याळाचे रेडियमचे कांटे अडीचच्या घरांत येऊन दाखल झाल्याचं त्यांना दिसलं नि उगीचच पुन्हां मरणाची कल्पना त्यांच्या मनावरून उडत गेली. अडीच...दोन वाजून तीस मिनिटं...एकतीस मिनिटं...बत्तीस मिनिटं...सेकंदासेकंदाला मरणाचं पाऊल पुढं पडत आहे...सेकंदासेकंदाला अब्जावधि जीव त्याच्या गारगार दाढांखालीं चिरडले जात आहेत. आत्तां या क्षणींहि...या क्षणींहि...

अन् दारावरची घंटा वाजत असल्याचा त्यांना भास झाला. ते या

कुशीचे त्या कुशीवर झाले नि कान देऊन ऐकूं लागले. पुन्हां घंटा किण-किणली...खरंच...कुणी तरी दारावर आलं आहे.

ते कॉटवरून उतरून व्हरांड्यांत येतात न येतात तोंच कुणा तरी महाराजांकडून आत्तांच्या आतां बोलावणं आलं आहे म्हणून सांगायला त्यांचा पुतण्या तिथं आला.

'कुठल्या महाराजांचं बोलावणं आलं आहे या वेळीं हें ?'

'कुणाला ठाऊक ! मी कांहीं त्याला विचारलं नाहीं.'

'कोण आलं आहे बोलवायला ?'

त्यांचाच कुणी नातलग असावा. 'चांगले झकपक कपडे करून आला आहे.'

'मग आंत बोलाव कीं त्याला.'

पण त्याला आंत बोलवावं लागलं नाहीं. तो आपणहूनच आंत आला नि डॉक्टरांना अभिवादन करून म्हणाला, 'आमचे महाराज एकाएकीं अत्य-वस्थ झाले आहेत. आतांच्या आतां माझ्याबरोबर निघालं—'

"कुठले महाराज?"

"तें वाटेंत सांगतों."

"काय झालं आहे त्यांना ?"

"तें आम्हांला कळलं असतं मग काय हवं होतं ? पण बहुधा—"

"ठीक आहे. येतों."

"मी आपला फार फार फार आभारी आहें."

"पण एक लाख रुपये व्हिजिट फी पडेल."

"एक लाखच काय ? हवी असल्यास दहा लाख घ्या. महत्त्व पैशांचं नाहीं. वेळेचं आहे."

"नको. एक लाखच पुरेत."

"मग निघतां ?"

"निघतों."

लगोलग कपडेत्रिपडे करून डॉक्टरांनीं आपली बॅग घेतली नि पुतण्याला 'जातों रे मी' असं म्हणून ते झपाझप जिना उतरून गॅरेजकडे वळले.

" डॉक्टर, आतां तुमची गाडी काढूं नका. मीं रथ आणला आहे त्यांतूनच जाऊं आपण. "

" रथ ? व्हॉट् डू यू मीन ? "

" रथ...आपला रथ हो... "

" नॉन्सेन्स्–मग खटारा कां नाहीं आणलांत ? "

" माफ करा डॉक्टर, पण आपल्याला जिथं जायचं आहे तिथं जायला तुमच्या गाडीचा कांहीं उपयोग व्हायचा नाहीं. "

" म्हणजे ? "

" म्हणजे आपल्याला सात आकाशं ओलांडून मृत्युदेवाच्या राज्यांत जायचं आहे. "

" ऑं ? "

" प्रत्यक्ष मृत्युदेव अत्यवस्थ झाले आहेत. "

" मृत्युदेव ? म्हणजे कोण यम ? "

" हं...यममहाराज...बरोबर आहे ! "

" यममहाराज ? म्हणजे कोण मरण...डेथ...अंत...शेवट ? "

" हं...तेच...तेच...! "

बोलत बोलत ते दोघेजण रस्त्यावर आले.

" बसा, डॉक्टर. "

" हा रथ ? अन् याला कोणतीं जनावरं जुंपलीं आहेत हीं ? "

" या जनावरांना तुम्हीं कधीं पाहिलेलं नाहीं, डॉक्टर ? "

" पाहिलीं आहेत...नाहीं कशीं ? यांना टोणगे म्हणतों आम्ही इथं ! "

" आमच्या महाराजांचं वाहन आहे हें जनावर ! "

रथ चालूं लागला. चंद्राला वळसा घालून तो मंगळाच्या दिशेनं निघाला. शुक्र मागें पडला. सूर्य दिसेनासा झाला. आकाशगंगेचं पाणी रथाच्या चाकांना लागलं. एक धूमकेतू 'काय आहे ? काय आहे ?' करून पंख फडफडवीत निघून गेला.

एक आकाश ओलांडलं गेलं. दुसऱ्या आकाशांतून रथ जाऊं लागला.

" पण मलाच कसं बोलावणं आलं मृत्युदेवाकडून ? "

" तुमचं नांव आमच्या कानांवरून गेलं नाहीं असं वाटतं कीं काय तुम्हांला ? "

दुसरं आकाश मागं पडलं. तिसऱ्या आकाशाचा पापुद्रा उघडला. चौथं...पांचवं...सहावं...सातवं...

डॉक्टरांनीं मनगटावरच्या घड्याळांत पाहिलं तों फक्त तीन वाजले होते. एवढ्या वेळांत आपण या रेड्यांच्या रथांतून इथवर आलों ?

" कसली व्याधि जडली आहे तुमच्या मृत्युदेवांना ? "

" अलीअलीकडेच त्यांना ब्लडप्रेशरचा विकार जडलाय्. "

" ब्लडप्रेशरचा ? "

" कां ? अहो, तुमच्या गेल्या महायुद्धांतच त्यांना किती माणसं खावीं लागलीं ! अन् रोज चाललंच आहे हें. मग सांगा, अंगांत रक्त जास्त होणार नाहीं तर काय ? "

" ते अत्यवस्थ झालेत म्हणजे काय झालं आहे ? "

" दोनच्या सुमारास त्यांना जो झटका आला त्यानंच ते बेशुद्ध पडले आहेत. "

" पहिल्यांदाच आलाय् का हा झटका ? "

" नाहीं–तिसऱ्यांदा. "

" हं ! "

" हं काय ? "

" कांहीं नाहीं ! "

मृत्युदेवाच्या प्रासादाच्या महाद्वारापाशीं रथ थांबला. एक नोकर लगबगीनं पुढं झाला नि त्यानं डॉक्टरांना सलाम करून त्यांच्या हातांतली बॅग आपल्याकडे घेतली. डॉक्टरांनीं रथांतून उतरून इकडे तिकडे पाहिल्यासारखं केलं तेव्हां प्रासादाच्या वरच्या दालनांत बरींचशीं काळींकभिन्न, राक्षसांसारखीं दिसणारीं माणसं चिंतातुर चेहऱ्यानं उभीं असलेलीं त्यांना दिसलीं. बोलवायला आलेल्या माणसाच्या पाठोपाठ डॉक्टर वर गेले.

महानिद्रेच्या सुवर्णमंचकावर मृत्युदेव बेहोष होऊन पडले होते. दास-दासी इंद्रनीलाच्या पंख्यांनीं त्यांना वारा घालीत होत्या. पायाशींच एक भटजी

मंत्र म्हणत बसले होते. एक वैद्यराज हेमगर्भाची मात्रा उगाळीत होते. एकजण लिंबांत पिंजर घालून त्याला टांचण्या लावीत होता. एक दाढीवाला हकीम आपली दवाई तयार करीत होता.

पण त्यांच्यापैकीं कुणाच्याच हालचालींत आत्मविश्वास प्रगट होत नव्हता. जणूं साऱ्यांनींच रोग्याची आशा सोडली होती. अन् रोगी कोण ? तर प्रत्यक्ष मृत्युदेव...

डॉक्टरांनीं खिशांतलं सांखळीचं घड्याळ काढून हातांत घेतलं नि बेशुद्धावस्थेंत पडलेल्या मृत्युदेवांकडे एकदां पाहिल्यासारखं करून त्यांनीं त्यांची नाडी घ्यायला सुरुवात केली. मग स्टेथोस्कोप कानाला लावून त्यांनीं त्यांची छाती तपासली नि एक दीर्घ निःश्वास सोडून ते बरोबर आलेल्या व्यक्तीला म्हणाले, ' अजून थोडी आशा आहे; पण जलदी केली तर. या साऱ्या लोकांना पहिल्यांदा इथून हांकलून लावा...नि ऑपरेशनसाठीं ताबडतोब यांना एका स्वतंत्र खोलींत हलवा.

मृत्युदेवाच्या डोक्याच्या आंतल्या बाजूस रक्तस्राव होत होता अन् मेंदूच्या एका शिरेवर झटपट शस्त्रक्रिया करून तो थांबविण्याची किमया डॉक्टरांना साधली होती.

झालं. ऑपरेशनची तयारी झाली. डॉक्टरांनीं बॅगेंतील सारीं हत्यारं काढून टबलावर मांडलीं. रोग्याला आंत आणण्यांत आलं. दोघांतिघांखेरीज खोलींत कुणालाच घेतलं गेलं नाहीं.

डॉक्टरांच्या रेशमी हातानं हत्यार उचललं नि तें चालविण्यापूर्वीं एक-दांच त्यांची नजर मृत्युदेवाच्या मिटल्या डोळ्यांकडे वळली.

एकाएकीं त्यांच्या मनांत मघापासनं सांकळून राहिलेलं वादळ पिसाटून उठलं...

अरे...अरे...ज्या क्षणाची तूं एवढ्या आतुरतेनं वाट पहात आहेस तो हा क्षण...तो हा क्षण...मृत्युदेवाच्या मृत्यूचा...अंताच्या अंताचा...मरणाच्या मरणाचा...मरणाच्या मरणाचा...

हें ऑपरेशन करतां करतांच असा कांहीं विलक्षण हात चालव कीं... कीं...यांतच त्याची अखेर व्हावी...यांतच त्याची अखेर व्हावी....

कुणालाच याचा पत्ता लागणार नाहीं...कुणालाच यांतलं कांहीं... कांहीं कळणार नाहीं. साऱ्या विश्वाचा तूं दुवा घेशील...साऱ्या चराचर सृष्टीला मरणाच्या विळख्यांतून सोडवशील...पहा...पहा...अजून विचार कर...या क्षणीं नीतिअनीतीच्या कल्पना मनांत आणल्यास तर आपला सर्वनाश ओढवून घेशील. अखेर...अखेर...या रोग्याला तूं जीवदान दिलंस तर हाच तुला खाल्ल्याशिवाय रहाणार नाहीं हें लक्षांत ठेव...

नि मग हत्यार उचल...

मग हत्यार उचल...

मग हत्यार...

हरकत नाहीं. केस फेटल ठरली तरी हरकत नाहीं. नव्हे, या पुढची कुठलीच केस फेटल ठरूं नये म्हणून...नव्हे, यापुढें कोणतीच केस होऊं नये म्हणून, ही केस फेटल झालीच पाहिजे.

डॉक्टर घामानं नुसते थबथबून निघाले होते. मरणाची थंडी पडली होती तरी त्यांचं मन तगमगत होतं.

जीवनाच्या प्रकाशांत डॉक्टरांच्या हातांतलं शस्त्र एकदांच लखलखलं नि डॉक्टरांनीं मनाशीं निश्चय केला....

ही केस फेटल झालीच पाहिजे...फेटल झालीच पाहिजे...

डॉक्टरांच्या मनांतलं वादळ संपलं...नि वज्राच्या गतीनं त्यांचा हात चालूं लागला.

मृत्युदेवाचा मेंदू उघडला गेला. त्याच्यावरची ती शीर डॉक्टरांनीं कात्रींत पकडली...आजूबाजूला सांकळलेलं रक्त काढून टाकलं नि टांके घालतां घालतां... करायची ती...करायची ती चूक केली.

ऑपरेशन संपलं तेव्हां मृत्युदेवाच्या अंगांत थोडीशीच धुगधुग राहिली आहे नि आतां पंधरावीस मिनिटांपुरताच हा आपला सोबती उरला आ हें डॉक्टरांखेरीज दुसऱ्या कुणाला कळण्यासारखंच नव्हतं. डॉक्टरांनीं एक दीर्घ निःश्वास सोडला नि स्वतःशींच ते पुटपुटले, ‘ संपलं. ’

“ संपलं ? ऑपरेशन संपलं ? ” कुणी तरी डॉक्टरांना विचारलं.

" हं... "

" आतां महाराज बरे होतील ? "

" तें मी कसं सांगूं ? माझ्या परीनं करायचं तेवढं मीं केलं आहे. "

डॉक्टरांनीं हत्यारं बॅगेंत टाकलीं नि ' ऑपरेशन थिएटर ' मधून बाहेर पडतां पडतां पुन्हा एकदां मृत्युदेवाकडे नजर फेंकीत ते मनगटावरील घड्याळा-कडे पाहिल्यासारखं करून म्हणाले, " जातों मी आतां. सकाळीं रिपोर्ट द्या मला."

" सकाळपर्यंत शुद्ध येईल त्यांना ? "

" यावी. "

डॉक्टर जायला निघाले.

" रोग्याच्या खोलीच्या आसपासहि कुणाला फिरकूं देऊं नका. सकाळीं आठाच्या सुमारास रथ पाठवा. मी येऊन जाईन. "

" ठीक आहे. "

" मग आतां मला परत जायला रथ मिळेल का ? "

" अलबत. "

" मग निघतों मी आतां. "

" थोडा वेळ थांबा. "

" कां ? "

" तुमची...फी... "

डॉक्टर जवळच आसनावर बसले. मिनिट दोन मिनिटांतच एक काळा-कभिन्न गडी मोहरांनीं भरलेलीं ताटंच्या ताटं घेऊन तिथं आला.

" हें काय ? "

" तुमची फी. "

" किती ? "

" दहा लक्ष मोहरा. "

" आँ ? "

" मग ठेवूं हीं ताटं त्यांत ? "

डॉक्टर स्वतःशींच विलक्षण हंसून म्हणाले, " ठीक आहे ! "

" बरं तर मी निघतों आतां. "

" मग सकाळीं येताय् तुम्हीं ? "

" ऑफ् कोर्स ! "

डॉक्टर जिना उतरूं लागले.

" डॉक्टर, काळजी करण्यासारखं कांहीं नाहींना ? "

" तें मी आतांच सांगूं शकत नाहीं. त्याला सकाळपर्यंत धीर धरायला हवा. "

डॉक्टर जिना उतरत होते. आज...आज त्यांच्या मनाला खरं समाधान लाभलं होतं. आपली महत्त्वाकांक्षा अशी सहजासहजीं पुरी करण्याची संधि आपणांस मिळेल असं त्यांना कधींच वाटलं नव्हतं. आपली महत्त्वाकांक्षा... साऱ्या चराचर सृष्टीला...साऱ्या विश्वाला...मृत्यूच्या पाशांतून मुक्त करण्याची...

इतक्यांत जवळच्याच खोलींतून एका अर्भकाच्या रडण्याचा आवाज त्यांना ऐकूं आला.

" कोण रडतं आहे ? "

" अं ?...कुठं कोण ? "

पुन्हा त्या अर्भकाच्या रडण्याचा आवाज ऐकूं आला.

" हें...हें...पहा...ऐका ! "

" हं...हें...हें...होय...? "

" हं. कोण रडतं आहे हें ? "

" हा मृत्युदेवांचाच मुलगा..."

" कुणाचा ? मृत्युदेवांचा ? "

" हं...कां ? दोनचार दिवसांपूर्वींच तो जन्मला..."

" अं ? म्हणजे...म्हणजे याला...याला अंतच नाहीं तर ? "

" अंत !...कशाला ? "

पण डॉक्टर कांहीं बोलले नाहींत. त्यांच्या नजरेपुढचं जग गदगदां हलूं लागलं होतं.

तसाच धाडधाड जिना उतरून ते खालीं आले तरीहि त्या अर्भकाच्या रडण्याचा आवाज त्यांच्या कानांत दाभणासारखा टोंचत होता.

...डॉक्टरांनीं सकाळीं डोळे उघडले तेव्हां उगीचच त्यांचं मन मरणाच्या कल्पनेनं भारावून गेलं होतं. एक लोकरी ओव्हरकोट नि एक गरम रग अंगावर घेऊनहि ही मरणाची थंडी अंगाला कशी बोंचते याचाच विचार करीत ते अद्याप पहुडले होते. असेच आपण झोंपून राहिलों तर आज आपल्याला हॉस्पिटलांत जायला उशीर होणार आहे हा विचारहि त्यांच्या मनाला शिवत नव्हता. या मरणाला जर कधीं अंत नाहीं तर हीं हॉस्पिटलं तरी कशाला हवींत याचंच कोडं त्यांना सुटेनासं झालं होतं...

१९५२

* * *

: ४ :

# माझा बाप मरतो त्याची गोष्ट

**माझ्या बापानं** अकलेचे दिवे पाजळले नि आमचं घर आपला पुतण्या रोंग्या याच्या कपाळावर मारलं तशी आये तणतणत घरातनं निघाली नि आपल्या आयेच्या घरांत ठाण मांडून बसली. तिच्या बरोबर माझ्या बहिणीही गेल्या. माझ्या बापानं तिची किती मनधरणी केली, किती विनवण्या केल्या. पण हट्! एक नाहीं नि दोन नाहीं. या खेपेला तिनं नवऱ्याला चांगलाच धडा शिकवायचा ठरविलं होतं. आईग–बाईग करून ती ऐकेना तशी माझ्या बापानं आपल्या हाडापेरांत मिसळलेला आळस टाकून देऊन गंभीरपणें कामाला लागल्याचं सोंग केलं. इतकंच करून तो थांबला असं नाहीं. आपण दारु प्यायचं नि जुगार खेळायचंही पार सोडून दिलं आहे अशी भलतीच हांकाटी करायला त्यानं आरंभ केला. बापड्याला वाटत होतं कीं, आपल्या या नाटकाला भुलून तरी बया परत येईल. पण माझी आये म्हणजे एक जाबन बाई होती. ती काय अशी अलबत्यागलबत्या सोंगांना फसते होय? तिनं हूं कीं चूं केलं नाहीं. तब्बल तीन महिने ती आजीकडे राहिली अन् तेवढ्या वेळांत आम्हांला बघायला ती एकदांसुद्धां फिरकली नाहीं. जणूं आमच्या विषयींची सारी माया तिनं गुंडाळूनच ठेवली होती. जसजसे अधिकाधिक दिवस जाऊं लागले तसतसा माझ्या सोंगाड्या बापाचा धीर सुटूं लागला. एखाद्या स्क्रू ढिला झालेल्या माणसासारखा, पोटाशीं गुडघे लावून तो नुसता घरांत बसून राहूं लागला. शेतांत गुडघागुडघा उंचीचं रान माजलं. उभ्या पिकांना धोका निर्माण झाला.

‘ आतां काय करायचं ? ’ त्यानं काकाचा सल्ला मागितला.

‘ काय करायचं म्हणजे काय ? सरळ जीव द्यायचा, दुसरं काय ! ’ माझ्या अजब काकानं सल्ला दिला.

‘ छट् ! तें आपल्याच्यानं व्हायचं नाहीं. जगण्यांत तर सगळी गंमत आहे ! ’ माझा बाप नाकपुड्या फुरफुरवीत म्हणाला.

‘ शिंच्या, खरंच तुला असं वाटतं ? ’ माझ्या काकानं रोकडा सवाल टाकला.

‘ आतां हा सगळा वितंडवाद राहूं दे. माझं मलाच झालंय् नकोसं ! ’ बाबा म्हणाला.

‘ मी सांगूं ? ’

‘ सांग. तूं आयुष्यभर नुसता दुसऱ्यांना सांगत रहा. तेवढंच तुझं काम—’

‘ पहा, अशी युगत सांगतों कीं तुझी बया पोरीबाळींसकट दुसऱ्या पावलीं परत आली पाहिजे ! हां ऽ ऽ ऽ’ काका दोन्ही डोळ्यांचीं बुबुळं कपाळांत चढवीत नि स्वतःवर भलताच खूष होऊन म्हणाला.

माझ्या आळशी नि बावळट बापाला तेवढाच दिलासा वाटला. लगेच भुंवया चढवून त्यानं काकाला विचारलं, ‘ कसली युगत ? ’

‘ सोपी आहे ! बिलकूल सोप्पी ऽ ऽ ! ’ काकानं उगीचच दोन्ही डोळे घट्ट मिटले नि जिभेनं ‘ टक्क ’ असा आवाज काढला.

बाबा आ वासून त्याच्याकडे पहात होता.

‘ एकदम सोप्पी ऽ ऽ, ’ काका म्हणाला. ‘ काय करायचं ! हां, तूं कांहीं दिवस कुठं तरी गडप व्हायचंस. काय ? तूं...कांहीं दिवस कुठंतरी गडप व्हायचंस. नुसतं गडप ! कुणाला कुठं दिसायचं नाहींस अन् थोड्या दिवसांनीं तुझ्या दाढीचे केंस छातीवर लोंबकळायला लागले कीं मला कळवायचं. ’

‘ म्हंजे काय होईल ? ’ माझ्या बेअकली बापानं प्रश्न विचारला.

‘ म्हंजे काय होईल ? हं...पुष्कळ होईल. पुष्कळ होईल...तुझी दाढी छाताडावर लोंबकळायला लागल्याची बातमी कळतांच उभ्या गांवांत मी पसरवून देतों कीं तूं मेलास म्हणून... ’

‘ ऑं ऽ ऽ ऽ ! ’

‘ ऑं ऽ ऽ ऽ कॉय ? उभ्या गांवांत पसरवून देतों कीं तूं मेलास म्हणून.

'असं कसं होईल?'

'पहा कसं होईल तें.'

'तरी पण—'

'तरी पण काय?'

'नाहीं, म्हंजे मी जिवंत असतांना मरीन कसा?'

'अगदीं बैल आहेस शुद्ध तूं. अरं बाबा, त्याच्यांत तर खरी खुबी आहे. तूं मेलास असं कळल्याबरोबर पहा तुझी बायको ऊर बडवीत परत येते कीं नाहीं तें. नाहीं आली तर मिशा उतरवीन, मिशा!'

मग बाबा भिंताडाला डोकं टेकून बसला नि काकाच्या 'युगती'वर खूप विचार करूं लागला.

पण त्याचं कांहीं समाधान होईना. त्याच्या बेअकली डोक्यांत शंकांचा कळप अद्याप धिंगाणा घालीत होता.

त्यानं पुन्हां काकाला विचारलं, 'पण तुला खरंच असं वाटतं का?'

बाबाचा हा प्रश्न ऐकतांच काकाला 'याला उभा खाऊं कीं आडवा खाऊं' असं झालं. डोक्यांत राख घातलेल्या भुतासारखा तो बाबाच्या अंगावर गुरगुरला, 'मला काय वाटतं तें मी सांगितलं आहे. पटलं तर घे, नाहीं तर सोडून दे.'

'तें खरं रे, पण मला असं म्हणायचं हाय...'

'तुला काय म्हणायचं आहे तें मला ऐकायचं नाहीं. माझा शब्द खोटा झाला तर डोकं तुळतुळीत तासून घेईन.'

'नाहीं पण—'

'बस्स्...पण नाहीं नि बीण नाहीं. मी सांगितलं तसं करायचं. कित्ती झालं तरी तुझी ती बायको आहे. तूं मेल्याचं कळतांच ती धांवत नाहीं येणार तर कोण?'

'तूं म्हणतोस तें खरं आहे!' अखेर माझ्या दीडशहाण्या बापाच्या डोक्यांत प्रकाश पडला नि काकाची युगत अंमलांत आणायचं त्यानं नक्की केलं.

मग आम्ही धिंडोऱ्याहून शिंगाड्याला आलों नि आमच्या तिथल्या खोपटांत बस्तान ठोकलं. शिंगाड्याला आल्याबरोबर माझ्या बापानं पहिलं

शहाणपणाचं कृत्य केलं अन् तें म्हणजे तांदळाचं एक पोतं खरेदी करण्याचं. रानफळं खाऊन शिंगाड्याच्या रानांत रात्र काढायची नि दिवसा मी फक्त गांवांत यायचा.

असा एक आठवडा गेला. पहिल्यापहिल्यांदां मी आमचा रेडा चरायला न्यायचा. त्याच्या पाठीवर बसलों म्हणजे कधींकधीं मला पेंग यायची नि तोल जाऊन मी कांट्याकुट्यांत पडायचों. कधीं मला हुक्की आली म्हणजे मी दुसरा एखादा चुकार रेडा त्याच्यासमोर हांकत आणायचा नि दोघांची द्यायची झुम्मड लावून. बस्स्...दे लगाव...दे लगाव...वाऽ ऽअसा मजा यायचा!

हळूहळू बाबाच्या दाढीचे केंस वारा प्यालेल्या वासरागत फोफावूं लागले.

एक दिवस तो मला म्हणाला, 'उद्यांपास्नं तूं रानांत येऊं नकोस. मी एकटाच राहीन इथं—'

मलाही तेंच हवं होतं.

मी नाकांत करंगळीचं गिरमिट फिरवीत म्हटलं, 'बरं.'

मग भराभर दिवस जाऊं लागले. बरेच दिवस बाबा गांवांत फिरकला नाहीं. एक दिवस रात्रीं खिडकीवर गोटे बसूं लागले. मी कंदील घेऊन खळ्यांत आलों नि पाहूं लागलों, तों एक लांबलचक केंसदाढीवाला बुवा! त्याच्या पाठुंगळीला कसलं तरी एक पोतं होतं. मी त्याला ओळखलं नाहीं.

'कोण बाबा तूं?' मी विचारलं.

'मी वेताळ आहें.' तो म्हणाला.

'तुझ्या पाठीवर हें पोतं कसलं?'

'त्यांत चेटकिणी नि समंध आहेत.'

'मग इथं काय तुझं काम?'

'साधतंय् तर!'

'साधतंय् तर? काय साधतंय् तर?'

'हाः हाः हाः हाः...अरं ओळखलं नाहींस तूं मला बेंबट्या...ए, बेंबट्या...अरं मी तुझा बाप नव्हं का रं? आँ?'

मी कंदील उंच धरला नि त्याच्या चेहऱ्यावर आलेलं केंसांचं जंजाळ बाजूला सारून पाहिलं. होय रे होय. हा तर बाबा. नक्की. अगदीं नक्की.

'हा ऽऽऽ कसा बनवला बेंबट्याला!'

'काय झक्क सोंग साधलंय् पण! वा वा ऽऽ'

'हां ऽऽ आतां तूं एक करायचंस...'

'काय?'

'तूं धिंडोऱ्याला जायचंस नि तुझ्या चुलत्याला कळवायचंस्. म्हणावं बाबानं तुला शिंगाड्याला बोलावलंय.'

'हां.'

रातोरात मी धिंडोऱ्याला आलों नि ढारढूर झोंपलेल्या चुलतीची नजर चुकवून चुलत्याला ढुसकला. पण त्या बेट्याची झोंप कसली वस्ताद! कित्ती गुदगुल्या केल्या, चिमटे काढले तरी तो दाद देईना. आतां काय करायचं? मी घरांत आल्याची काकाशिवाय इतर माणसांना तर चाहूलही लागतां नये नि हें धूड जरा जागं व्हायलाही तयार नाहीं. अखेर निर्वाणीचा उपाय म्हणून मी काकाच्या पोटावर बसलों नि त्याच्या छातींत एक जोराचा ठोसा दिला. तशी काका 'ओयू ओयू' करीत उठला. मला भय होतं कीं, त्याची ती ओरड ऐकून घरांतलीं माणसं उठतात बिठतात कीं काय म्हणून! पण नाहीं; आमच्या काकाच्या घरांतील माणसांची झोंप आमच्या काकाच्या झोंपेसारखी होती म्हणून सुटलों.

'कोण?' काकानं मिचमिच डोळे करीत विचारलं.

'मी.'

'ऑं...बेंबट्या? कारं ऽ? तूं इथं कसा?'

'बाबानं पाठवलंय् तुला बोलवायला.'

'असं? मग आतां मी मोठमोठ्यानं रडायला लागतों. तूंही माझ्याबरोबर सुरुवात कर. काय?'

'हां.'

मग काका अंथरुणांत उठून बसला नि गळा काढून रडूं लागला. त्याच्याचबरोबर मीही रडूं लागलों. आम्हां दोघांची रडारड ऐकून घरांतलीं झाडून सगळीं माणसं गोळा झालीं.

'अहो झालं काय?...झालं तरी काय?...' कुणाला कांहींच पत्ता

लागेना. पण आम्हांला कुठं त्याची फिकीर होती ? मी नि काका...नव्हे, माझा काका नि मी मारे रंगांत येऊन बोंबलत होतों. त्यामुळं आम्हांला जरा बरं वाटत होतं.

कुणाला कांहींच कळेना, तशी माझी चुलतीही त्या रडारडींत सामील झाली. तिच्याबरोबर तिचीं पोरंही. मग शेजारी गोळा झाले.

'ऑं ऽऽऽ असं सगळ्यांना एकदम रडायला झालं काय ?'

जमलेलीं माणसं एकमेकांकडे आ वासून पाहूं लागलीं. त्यांतल्या त्यांत चाणाक्ष होतीं त्यांनीं घरांतून नजर फिरवीत कुणी दगावलं बिगावलं तर नाहीं ना याची खात्री करून घेतली.

घरांत मयत तर दिसेना नि सगळीं बेंबीच्या देंठापासून बोंबटतात तर खरीं ! मग शेजाऱ्यांनींही नाकाला धोतराचे सोगे लावले नि उगीचच सूं सूं करायला सुरुवात केली. काकाचं नि माझं रडणं अगदीं खड्या नि मनमोकळ्या सुरांत चाललं होतं. थोड्या वेळानं काकानं उशीवर डोकं आपटून घ्यायला सुरुवात केली नि तो कैंकाटूं लागला, 'अर कसा र सोडून गेलास आम्हांला ? कारं रागावलास आमच्यावर ?'

मग कुणीतरी माझ्या बरगडींत अंगठा खुपसून विचारलं, 'काय झालं रे ?'

'बाबा मेला.'

क्षणभर मी रडायचं विसरलों. पण लगेच माझ्या लक्षांत आल्याबरोबर मी पुन्हां भोकांड पसरलं.

'कुणाचा ?'

'माझा.'

'कधीं ?'

'दुपारीं.'

'कुठं ?'

'शिंगाड्याला.'

'कशानं ?'

'रोगानं.'

'कसल्या ?'

'साध्याच.'

'साध्याच, पण नक्की कुठल्या रोगानं ?'

'पडशानं.'

त्या माणसाच्या प्रश्नाला उत्तर देतांना माझी कुठं तरी चूक झाली असावी. कारण काका एकदम रडायचा थांबला नि म्हणाला, 'पडशानं नाहीं. भगंदरानं–' एवढं बोलून तो पुन्हां रडूं लागला.

हळूहळू माझा बाप मेल्याची बातमी संबंध गांवांत पसरली. आमच्या आयेच्या कानांवर ती नक्कीच गेली असणार.

माझ्या काकाला वाटलं होतं कीं, बातमी समजतांच ती ऊर बडवीत परत येईल. म्हणून रात्रीचे तीन–साडेतीन वाजेपर्यंत आम्हीं तिची वाट पहात राहिलों होतों. पण ती कांहीं आली नाहीं.

सकाळींच दाढीमिशावाला माझा बाप धिंडोऱ्याहून शिंगाड्याला आला नि काकाच्या घरांत लपला. मग काका नि मी आजीच्या घरीं गेलों नि आयेला म्हणालों, 'आये, बाबा गेला.'

आये कांहीं बोलली नाहीं. घिम्या घिम्या ती आपली ताक घुसळत होती.

मग काकानं खांकरल्यासारखं केलं नि आयेला उद्देशून म्हटलं, 'बाबा काल संध्याकाळीं वारला—'

तरीही आये कांहीं बोलली नाहीं कीं मान वर करून तिनं पाहिलं नाहीं.

थोड्या वेळानं मी म्हटलं, 'आये, बाबा काल मेला.'

अंऽहं...तरीही कांहीं उपयोग झाला नाहीं.

मग तसेच आम्हीं उठलों नि मुंड्या खालीं करून घराकडे परतलों.

माझा दाढीवाला बाप परसांतल्या दारीं पांगाऱ्याची काठी तासीत बसला होता. घरांतल्या लोकांना वाटत होतं, हा कुणी साधू आहे.

मग आम्ही घडलेला सारा प्रकार त्याला सांगीत तिथंच बसलों. थोडा वेळ होतो न होतो, तोंच आये पोराबाळांना घेऊन धाड् धाड् पाय आपटीत तिथं आली नि झिंज्या पिंजारून रडूं लागली. मोठा गळा काढून रडतां रडतां तिनं कपाळचा मळवट पुसून टाकला. बांगड्या फोडून टाकल्या नि

कोंपऱ्यांतल्या जात्यावर कपाळ आपटून घेत ती बडबडूं लागली, ‘अर गेलास तर माझा गळा दाबून कां गेला नाहींस? तुझ्यामागं हा पोराबाळांचा जंजाळ र आतां कोण बघणार?...’

तिच्याबरोबर घरांतल्या सगळ्यांनीं सूर धरला.

मला आंतल्या आंत खूप हंसू येत होतं. बराच वेळ मी तें दाबून ठेवलं होतं. मला अगदींच रहावेना तशी मी खांबाआड थोबाड लपविलं नि गालांतल्या गालांत खूप हंसून घेतलं.

बाबाही अधनंमधनं मला डोळा घालीत होता.

मग भुतानं झपाटल्यासारखी आये उठली नि माझ्या दोन्ही बकोट्या धरून मला फरफटीत नेत किंचाळली, ‘चल र बेंबट्या, आतां या घरांत राह्यचं नाहीं. तुझा बाप आळस करून करून मेला तसं करून भागायचं नाहीं...’

आये खूप खूप बडबडत होती. मेलेल्या बाबालाही शिव्या घालीत होती.

फरपटत फरपटत तिनं मला खळ्यांत आणलं. ती म्हणाली, ‘हें घर आपलं, पण त्या मुडद्यानं हें पुतण्याच्या डोक्यावर मारलं. पोराबाळांना भिकेला लावून अखेर मेलाही...’

मग मला रहावेना. मी मागं वळून बाबाला साद घातली,

‘बाबा...बाबा...!’

बाबाही कळवळला. त्यानं मला आयेच्या तडाख्यांतून सोडवला नि आपल्या चेहऱ्यावरचे केंस बाजूला करीत तो आयेला म्हणाला, ‘बये, बेंबट्याचा बाप अजून जिता आहे नि तो तुझ्यासमोर उभा आहे. तीन महिने झाले तरी तूं परत यायचं लक्षण दिसेना म्हणून मला असं मरावं लागलं. बये! अग, असलं एक घर गेलं तर छप्पन्न बांधून देईन तुला असलीं. अन् घर गेलं घर गेलं म्हणजे का तें कुठं बाहेर गेलंय्? तें तर आपल्याच घरांत आहे. ऑऽऽ ऽ’

बाबा बोलत होता तोंपर्यंत त्याला कसलीच दाद नव्हती. पण त्याचं बोलणं संपल्यावर मात्र त्याच्या बथ्थड डोक्यांत उजेड पडला कीं, आपली बायको बेशुद्ध पडली आहे नि कुणी पाणी आणायला धावतो आहे, कुणी कांदा ठेंचतो आहे... कुणी नाकाजवळ वहाण धरतो आहे...

पण त्याचं त्याला फारसं वाटत नव्हतं. कांहीं कां असेना, पण आपली जावन बायको अखेर घरीं परत आली याच कल्पनेंत तो मश्गूल झाला होता नि माझा काका त्याच्याकडे पाहून गालांतल्या गालांत हंसत होता.

हो, तो कां हंसणार नाहीं? माझ्या बापाच्या मूर्खपणामुळंच त्याच्या पोरग्याला आमचं घर बक्षिसीदाखल मिळालं होतं ना?

शिवाय आतां आये शुद्धीवर आल्यावर तिला मळवट भरावा लागणार होता...तिला नव्या बांगड्या आणाव्या लागणार होत्या...नवी साडीचोळी घ्यावी लागणार होती त्याचा खर्च माझ्या काकावर थोडाच पडणार होता? तो तर सारा माझ्या बेअकली बापालाच करावा लागणार होता!

दुसऱ्या दिवशीं गुंडा न्हाव्याकडून आपली छातीवर रुळणारी दाढी नि पाठीवर हिंदकळणारे बैरागी केंस उडवून टाकतांना माझ्या बेअकली नि एक नंबरच्या आळशी बापानं मला विचारलं, 'काल तुझ्या आयेला झीट आली याचं कारण काय?'

झीट यायचं कारण आयेच्या त्या वेळच्या नजरेवरून मी ओळखलं होतं.

मी नाटकांतल्या घटोत्कचासारखे हातवारे करीत म्हटलं, 'आपला बेअकली नि एक नंबरचा आळशी नवरा खरोखरच जिवंत आहे या गोष्टीचा तिनं धसका घेतला म्हणून—'

गुंडा बाबाच्या उजव्या गालफडावरून वस्तरा फिरवीत होता. त्यामुळं बाबापासून कसली भीति बाळगायचं मला कारण नव्हतं. नाहींतरी मला मारायचा विचारही त्याच्या आळशी मनाला शिवला नसावा.

त्यानं मला शांतपणानं विचारलं, 'म्हणजे मी मरावं अशी तिची इच्छा आहे तर?'

मी म्हटलं, 'हो.'

'पण जगण्यांत तर सगळी गंमत आहे!'

मी म्हटलं, 'असेल. मला माहीत नाहीं.'

१९५१

* * *

: ५ :

# चाकोऱ्या

बैलगाडी पुढं पुढं चालली होती. पायाखालच्या तांबड्या मातींत उमटलेल्या दोन समांतर रेषांवरून तिचीं चाकं सरकत होतीं. या रेषांना आरंभ नव्हता, अंत नव्हता. जवळच्याच झाडींतून कुठून तरी एक पक्षी एकटाच कूऽऽ कूऽऽ कू करीत बसल्याचं ऐकूं येत होतं. खटाऱ्याच्या खडखडाटानं बावरलेल्या खारी आपल्या शेपटीचे झुबके फुलवून सैरावैरा पळत होत्या...उजवीकडच्या बाजूला बऱ्याच अंतरावर एक धुळीचा स्तंभ आकाशांत चढूं लागला होता. मी आईला विचारलं, 'आई, काय ग तें?' पण पहिल्यांदा आई कांहींच बोलली नाहीं. तो धुळीचा स्तंभ आणखी आणखी वर चढूं लागला...भिंगरीसारखा गरगरूं लागला तेव्हां मला रहावेना. पुन्हां आईला विचारलं, 'सांग ना ग आई!' अन् माझ्याकडे न पहातांच ती म्हणाली, 'भुताटकी.' मग कितीतरी वेळ माझ्या तोंडून शब्दच निघेना. मी नुसताच त्या स्तंभाकडे पहात राहिलों... थोड्या वेळानं बंद केलेल्या कारंजासारखा तो हळू हळू उतरूं लागला नि दिसेनासा झाला...मग मला बाहेर बघत राहण्याचा कंटाळा आला नि मनाशींच कांहींतरी बोलत मी लांब कुठंतरी नजर टाकली. दुपारची वेळ होती तरी केशव पेंगत होता. वत्सला मलूल झाली होती अन् अन्ता डुलक्या खात होता. मी त्या सगळ्यांकडे एकदम पाहिलं. पहिल्यांदा त्याचं मला हसूं आलं. मग कींव आली...मग हळू हळू आपलेपणा वाटूं लागला. कशीं झालीं तरी तीं

माझ्यापेक्षां लहान होतीं. मी तरी कुठें फारसा मोठा होतों म्हणा ! पण गाडींतून उतरतांना मला उतरून घ्यावं लागत नसे. शिवाय रामूकाकांनीं मलाच नव्हतं का सांगितलं कीं, आतां तुझे नाना वारले आहेत, यापुढं नीट अभ्यास कर, तुझे आतां खेळण्याहुंदडण्याचे दिवस गेले म्हणून ? रामूकाकांचे हे शब्द मला आठवले नि माझ्या एवढ्याशा अंगावर मोठी थोरली जबाबदारी येऊन पडल्याची जाणीव मला झाली. मी गंभीरपणानं आईच्या पांढऱ्या फटफटीत कपाळाकडे पाहून घेतलं नि आमचे नाना वारले त्या दिवसाची रात्र आठवूं लागलों. नाना तर वारले, आतां आईला...केशवला...वत्सलेला...अन्ताला माझ्याशिवाय दुसरं कोण आहे असं कांहींसं माझ्या मनांत आलं नि शून्य नजरेनं मी उगीचच बाहेर पाहूं लागलों...

बैलगाडी पुढं पुढं चालली होती. पायाखालच्या तांबड्या मातींत उमटलेल्या दोन समांतर रेषांवरून तिचीं चाकं सरकत होतीं. एकाएकी मला वाटूं लागलं कीं, गाडीपासून हीं चाकं निखळून सुदर्शन चक्रांसारखीं भिरभिरत आकाशांत चढताहेत...मोठमोठीं होताहेत...नि सारं आकाश व्यापून टाकीत आहेत.

मी उगीचच आईला विचारलं, 'आपण मामाकडे किती दिवस रहायचं ?' आईनं एक निःश्वास सोडला नि तिनं नुसतं माझ्याकडे पाहिलं.

'आपण किती दिवस रहायचं मामाकडे ?'

'कुणास ठाऊक ? मला कुठं माहीत आहे ?'

'आई, पण मामाकडे कशाला जायचं आपण ?'

'मग दुसरं कुठं जायचं ?'

'दुसरीकडे कुठंतरी.'

'दुसरीकडे, पण कुठं ?'

'कुठंतरी.'

'वेडा आहेस तूं. दुसरीकडे कुठं जायचं तर आपल्याकडे पैसे नकोत का ? ते कुठून आणायचे ?'

मग मला पुन्हां नानांची आठवण झाली. ते जिवंत होते तेव्हांचीं कांहीं चित्रं भुरकन् माझ्या नजरेसमोरून गेलीं नि ते वारले त्या दिवसाची ती रात्र डोळ्यापुढं येऊन उभी राहिली.

मग मी कांहींच बोललों नाहीं. नुसताच पाहूं लागलों नि विचार करूं लागलों....संध्याकाळ झाली. तिरपीं झालेलीं उन्हं संत्र्याच्या सालीसारखीं दिसूं लागलीं. लांब लांब पसरलेल्या सावल्या मालवूं लागल्या. आतां रस्त्यावर माणसं दिसूं लागलीं. गुरांचे कळप घेऊन घराकडे परतणारे शेतकरी दिसूं लागले. गांव जवळ जवळ येत चालला तशी आई आम्हांला म्हणाली, 'तिकडे गेल्यावर धिंगामस्ती करूं नका. कुणाशीं भांडूं नका. आपापला अभ्यास नीट करीत जा ...नि लवकर लवकर मोठीं व्हा ' हें ऐकतांच माझं मन ढवळून निघालं. माझे डोळे पाण्यानं डबडबले नि बाहेरचं कांहींच दिसेनासं झालं. कसबसं मी रडूं आवरून घेतलं नि मनाशीं खूप खूप ठरवलं कीं, लवकर लवकर मोठं व्हायचं. पुन्हा एकदां मी केशवकडे पाहिलं नि नाना वारले ती रात्र कारण नसतां मला आठवूं लागली.

—गाडी गांवांत शिरली तसं कुणीतरी विचारलं, 'कुठली रे मंडळी ?' उगीचच बैलांच्या पाठीवरून चाबूक ओढून ह्यॅ ह्यॅ च्यक्...च्यक् करीत गाडीवान म्हणाला, 'ममईहून आल्याती. गुजराळींतल्या देसाय वकिलांकडची.'

गाडी बाजारपेठेंतून जाऊं लागली. लहान लहान दुकानांवरचे कंदील भगभगूं लागले होते. मोठ्या दुकानांवरील पेट्रोमॅक्सच्या बत्त्यांचा सूंऽऽ... झूंऽऽ असा आवाज होत होता. गुळाचा...गवताचा...शेणाचा...सुक्या मासळीचा वास सगळ्या बाजारपेठेंत कोंबून राहिला होता.

गाडी पुलावरून जाऊं लागली. खालच्या खाडींतून दोन मचवे मासोळी-सारखे सरसरत चालले होते. त्यांच्या डोलकाठीवरचे कंदील वरून मांजराच्या डोळ्यासारखे दिसत. कुठूनतरी झर्रकन् गार वाऱ्याची झुळूक आली नि तिच्या-बरोबरच वहात आलेल्या ओल्या मातीच्या वासानं मी भानावर आलों...नकळतच माझी नजर...केशव...वत्सला...अन्ता...यांच्याकडे गेली...नकळतच मी आईकडे पाहिलं नि पुन्हा उदास होऊन बाहेरच्या अंधाराकडे पहात राहिलों.

गाडी थांबली तशी आईला विचारलं, 'उतरायचं ?'

आईनं बाहेर पाहिलं नि म्हटलं, 'हं' त्याबरोबर ताबडतोब मी खालीं उडी घेतली नि केशवला म्हटलं, 'उतरा रे.' सगळीं मुलं उतरल्यावर आईनं सामान काढून गाडीवानाकडे दिलं नि खालीं उतरून ती उगीचच कुठंतरी

पहात राहिली. मी तिच्याकडे पाहिलं तेव्हां पदराचं एक टोक तिनं डोळ्याला लावलं होतं.

हळू हळू पायऱ्या उतरून आम्हीं खळ्यांत आलों. गाडीवानानं मोठ्यानं कुणालातरी हांक मारली 'ओ वयनीऽऽऽ...' पडवींत कुणीतरी दिवा लावीत होतं. त्यानं बसल्याच जागेहून विचारलं, 'कोण?' 'वयनीस्नी सांगा मावशीबाय आल्याती ममईहून.' मग तो दिवा लावणारा मनुष्य दारांत येऊन उभा राहिला नि आमच्याकडे पाहूं लागला. 'कोण?...रमामावशी?' आई कांहींच बोलली नाहीं. ती सरळ आंत शिरली नि पडवीवरच्याच बांकड्यावर बसून मुसमुसूं लागली. नाना वारल्यावर कितीतरी लोक आईला भेटायला आले होते नि प्रत्येक वेळेला त्यांच्यासमोर आई रडली होती. तिच्या या रडण्यांत आम्हांला कांहींच नवीन नव्हतं म्हणून आम्हीं मुकाट्यानं तिच्या बाजूला जाऊन बसलों नि इकडे तिकडे पाहूं लागलों. आंतून दोनचार मुलं एव्हांना तिथं आलीं होतीं नि आमच्याकडे टकामका पहात होतीं.

आईचं रडणं थांबल्यावर तो दिवा लावणारा गृहस्थ म्हणाला, 'दादा सकाळींच गेले आहेत मलकापूरला कोर्टाच्या कामासाठीं. वहिनीसुद्धां गेल्यात देवगोठण्यास लोकलबोर्डाच्या कामासाठीं. घरांत फक्त आजी आहेत.'

मग आई आंत गेली नि पुन्हां रडूं लागली. आमच्या आयुष्यांत तिच्या आईला...नि आमच्या आजीला आम्हीं पहिल्यांदाच पहात होतों. कंपासपेटीं-तल्या सेटस्क्वेअरसारखी ती कमरेंतून वांकली होती नि आईकडे पहात राहिली होती.

त्या रात्रीं आम्हीं जेवलों नि झोंपलों...आई नि आजी मात्र बराच वेळ बोलत बसलीं होतीं...मीं तें ऐकायचा प्रयत्न केला पण माझ्या डोळ्यावर इतकी भयंकर झोंप आली होती...पुन्हां मला नाना वारले ती रात्र आठवली...त्या रात्रींहि अशीच भयंकर झोंप मला लागली होती. नाना वारले तेव्हां मी झोंपलों होतों....मध्यरात्रीं कशानशी जाग आली तेव्हां सर्वत्र रडारड...आईला फीट आली होती...कुणीतरी कांदा ठेंचत होतं...माझ्या हें सारं लक्षांत येण्यापूर्वींच मी पुन्हा झोंपी गेलों होतों... सकाळीं उठून पाहिलं तों नाना नाहींत...मग मीं स्वतःच समजलों...नाना

वारले. आतां आपलं कसं होणार ? हळू हळू लोक जमायला लागले. नानांचे कागदपत्र तपासून पाहूं लागले नि कपाळाला आंठ्या घालून विचारूं लागले, ' एवढ्या मुलांचीं शिक्षणं व्हायचीं आहेत...कसं होणार हें सगळं एवढ्यांत ? ' मग रामूकाकांनीं ठरवलं होत कीं, आम्हीं मामाकडे जाऊन रहावं...त्यांनीं आईला सांगितलं. आईनं पहिल्यांदा ऐकलं नाहीं. ती म्हणाली, ' तिथं या चार मुलांना घेऊन मी कसं राहूं ? माझ्याकडे पैसा असता तर भाऊ म्हणून त्यानं ओळख दिली असती. ' पण रामूकाकांनीं अखेर तिची समजूत घातली. रामूकाका आमचे शेजारी होते पण त्यांनीं अगदीं आपलाच भाऊ वारला आहे असं समजून आईला काय सांगायचं तें सांगितलं...

सकाळीं आम्हीं उठण्यापूर्वींच दादा आले...पण ते कुणाशींच कांहीं बोलले नाहींत. दुपारीं वहिनी आल्या नि घरांतली कुजबुज वाढूं लागली.

आई स्वैंपाकघरांत बसून होती. तिला कसला तरी भयंकर पेंच पडला असावा. मी माजघरांत डोकावून पाहिलं तेव्हां वहिनी नि दादा आपसांत कांहींतरी कुजबुजत होतीं. मीं त्यांच्याकडे पाहिलंच नाहीं असं दाखवून पडवीवर आलों नि बाहेरच्या बांकावर बसलों. आजी तिथंच वाती वळत बसली होती.

मला पहातांच तिनं जवळ बोलावलं नि अगदीं हळू आवाजांत विचारलं, ' उन्हाळ्याची सुट्टी किती दिवस आहे तुला ? '

मी म्हटलं ' दहा तारखेपर्यंत. '

' मग तुम्ही इथनं कधीं जाणार ! '

हा प्रश्न ऐकतांच मी एकदम घाबरून गेलों. मला याचा कांहींच अर्थ समजेना...आई म्हणाली होती, आतां आपण इथंच रहायचं आहे नि ही तिची आई असं काय विचारते आहे ? मीं तिला ताडकन् एक मुसंडी मारली नि तिथून जो पळत सुटलों तों स्वैंपाकघरांत बसलेल्या आईला जाऊन बिलगलों... मला कांहीं सांगायचं आहे हें तिच्या लक्षांत येतांच ती उठली नि आम्हीं दोघं खालीं विहिरीवर जाऊन बोलूं लागलों.

' काय झालं रे ? '

'आजीनं आतां मला काय विचारलं ठाऊक आहे ?'

'काय ?'

'तुला उन्हाळ्याची सुट्टी किती ?'

'मग ?'

'मग मी म्हटलं, दहा तारखेपर्यंत.'

'हं.'

'तेव्हां तिनं एवढाले डोळे करून मला विचारलं—' अन् एकदम मला रडूं कोसळलं. माझे दोन्ही खांदे धरून मला गदगदा हलवीत आई म्हणाली, 'काय—काय विचारलं ?'

'तिनं विचारलं,' पुन्हां रडूं फुटूं पहात होतं पण कसबसं मी तें आवरलं. 'मग तुम्ही इथनं कधीं जाणार ?'...

कितीतरी वेळ आई तिथंच उभी होती...रात्रीं ती जेवली नाहीं. सकाळीं तिनं विश्रामच्या हातावर कांहीं पैसे ठेवले नि त्याला कांहींसं सांगितलं...

दुपारीं ती केवळ दाखविण्यापुरतीच पानावर बसली...थोड्या वेळानं विश्राम आला तेव्हां आदल्या दिवशींचं गाडींतून काढलेलं नि अजून जसंच्या तसं असलेलं सामान तिनं त्याला गाडींत ठेवायला सांगितलं......

दादा कोर्टांत गेले होते...वहिनी माजघरांत झोंपल्या होत्या..आजी बाहेरच्या बांकावर वाती वळीत बसली होती.

आई सरळ बाहेर गेली नि गाडींत जाऊन बसली. केशव...वत्सला... अन्ता हेहि तिच्या पाठोपाठ बाहेर पडले. आजीचं इकडे कशाकडेहि लक्ष नव्हतं. ती दाराकडे पाठ करून बसली होती...

मी कसाबसा तिच्याजवळ गेलों नि तिला हाक मारून म्हटलं, 'आम्हीं जातों...दादा—वहिनींना सांगायला सांगितलं आहे आईनं' एवढे शब्द मी जेमतेम कसेतरी नाटकांतल्या पात्रासारखे म्हटले नि तिथून जो धूम पळत सुटलों तों गाडींत येऊन बसलों....क्षणभर मागं वळूनहि मी पाहिलं नाहीं.

घरांतलीं तीं दोनचार पोरं गाडीजवळ जमलीं होतीं पण त्यांना यांतलं कांहींच समजण्यासारखं नव्हतं...

बैलगाडी पुढं पुढं चालली...पायाखालच्या तांबड्या मातींत उमटलेल्या दोन समांतर रेषांवरून तिचीं चाकं सरकत होतीं. एकाएकीं मला वाटूं लागलं कीं, गाडीपासून हीं चाकं निखळून सुदर्शन चक्रांसारखीं भिरभिरत आकाशांत चढत आहेत...मोठमोठीं होताहेत...सारं आकाश व्यापून टाकीत आहेत....

थोडं पुढं गेल्यावर मी आईला विचारलं.'कुठं चाललों आहोंत आपण?' तिनं एक निःश्वास सोडला नि नुसतंच माझ्याकडे पाहून डोळ्याला पदर लावला!

१९४८

* * *

: ६ :

# अखेरचा दिवस

आज पंतांच्या वयाचीं पंचावन्न वर्षं पुरीं होत आहेत. छत्तीस वर्षं, तीन महिने नि चौदा दिवसांची नोकरी पूर्ण करून ते आपली कुरूकुरू चालणारी लेखणी खालीं ठेवून सेवानिवृत्त होणार आहेत. आतां यापुढं आयुष्यांत कांहीं करण्यासारखं असं त्यांना उरलेलं नाहीं. आजपासून सात आठ महिन्यांची जी कांहीं 'लीव्ह प्रायर टू रिटायरमेंट' मिळेल तेवढी घ्यायची नि 'हरि हरि' करीत अखेरच्या दिवसाची वाट पहायची एवढंच त्यांचं या जगांतलं काम उरलं आहे. रिटायरमेंट लीव्ह संपतांच फंडाचे वगैरे मिळून सात आठ हजारांच्या मायेचं बोचकं पाठंगुळीला मारून पंत घरीं येतील नि छाती पुढं काढून पोराबाळांना म्हणतील, 'पहा रे शिंच्यांनो माझी कर्तबगारी!' सात आठ हजारांच्या त्या नोटा पहातांच पंतांच्या बायकोच्या अंगावर कांटा उभा राहील नि दाराकडे चमत्कारिक नजरेनं पाहून ती म्हणेल, 'हें काय, एवढे पैसे कधीं घरीं का आणायचे असतात? उगीच एकेक जबाबदारी!' आपल्या बायकोचं हें करवादणं नेहमींचंच आहे असं म्हणून पंत तिच्या म्हणण्याकडे काडीइतकंहि लक्ष न देण्याची कोशीस करतील. पण त्यांना तें जमणार नाहीं. तिची जिरवण्याच्या हेतूनं ते म्हणतील, 'अग हो हो, माझी उभ्या आयुष्याची कमाई आहे ही! एकदां तरी तिला हातानं कुरवाळूंदेत कीं! एखाद्या चोराला आपल्या घरांत बळजबरीनं ढकलला तरी तो इकडे तिकडे न पहातांच पोबारा करील. चोराला आपल्यासारख्यांनीं घाबरायचं कारण काय?

चल आण, तुझं तांदूळ मोजायचं मापटं. अलीबाबानं मापट्यानं पैसे मोजले तसे आपण मोजूं. हं, बबड्या...हा घे तुला रुपया. करून घे जिवाची चैन. शरद ये तुमकु आठ आना...और कुमुद...हे तुझे आठ आणे'...हे असले बेफिकीरीचे उद्गार काढूनसुद्धां पंतांना रात्रीं झोंप लागणार नाहीं. कसंहि झालं तरी ते त्यांच्या आयुष्यांतील कमाईचे पैसे आहेत. चुकून एखाद्या चोराला वास लागला तर तो डोकीवरून साफ हात फिरविल्याखेरीज राहाणार नाहीं याची पुरेपूर जाणीव पंतांना असेल. दुसऱ्या दिवशीं ते बँकेंत जातील नि आपल्या नांवाचा आठ हजार रुपयांच्या रकमेनं अकाऊंट उघडतील. तेव्हां कुठं त्यांचा जीव भांड्यांत पडेल. मग...कांऽऽहीं नाहीं...दर पहिल्या तारखेला मोजके पैसे बँकेंतून काढणं...दोन वेळां जेवणं...चहा घेणं...केसरी वाचणं...झोंपा काढणं...अधूनमधून संध्याकाळीं फिरायला जाणं...अन् अखेरच्या बोलावण्याची वाट पहाणं. पंतांच्या आयुष्यांतील कार्य आज समाप्त होत आहे. कारकून होण्यासाठीं आयुष्याचीं पहिलीं अठरा वर्षं खर्चीं घालावींत, मग छत्तीस वर्षे तीन महिने नि चौदा दिवस खर्डेघाशी करावी अन् साहेब जी रक्कम कपाळावर मारील ती घेऊन आपला रस्ता सुधारावा एवढंच नियतीनं त्यांच्या कपाळीं लिहून ठेवलं आहे. या रेषांच्या चाकोरीबाहेर त्यांच्या आयुष्याचा गाडा चुकूनहि जाणार नाहीं. तसं करायचं त्यांना कांहीं कारणहि नाहीं.

आतां मरायचं एवढंच पंतांच्या आयुष्यांत उरलं आहे.

आज पंत नेहमीप्रमाणं उठतील. सकाळचं वर्तमानपत्र वाचतील, थोडा वेळ गॅलरींत जाऊन उभे राहातील. एवढं होईहोईस्तंवर पावणेनऊ वाजतील. मग पंत घाईघाईनं नळावर जातील. दोनचार तांबे कसेबसे अंगावर ओतून आंघोळ करतील नि स्वतःशींच कांहींतरी पुटपुटत अन् शेंडी झाडीत ते घरांत येतील. तेवढ्यांत शेजारच्या बाबुरावांची परवल त्यांच्या कानीं येईल, 'काय पंत, आजचा तुमचा शेवटचा दिवस. फ्रॉम् टु डे यू वील बी ए फ्री सोल. नो किक्स...नो बॅड वर्डस्...नो फायरींग. आम्हांला अजून आठ वर्षं घाशीत बसायचं आहे'. यावर पंत कांऽऽहीं उत्तर देणार नाहींत. तसेच ते पानावर येऊन बसतील. बकाबका दोन घांस खातील नि रोजची संवय झालेल्या घाईघाईनंच कोटटोपी चढवून दहा–सतरा पकडायला म्हणून धूम पळत

सुटतील. रस्त्यांत कुणीतरी ओळखीचा भेटलाच तर तो त्यांना म्हणेल, 'अहो पंत, आज एवढी लगीनघाई कशाला? आज तर तुमचा अखेरचा दिवस!' पंत यावर दांत विचकून हंसले तर हंसतील नाहींतर तसेच सरळ त्याच्या अंगावरून निघून जातील. ते मनांतल्या मनांत म्हणतील, 'अखेरचा दिवस असला म्हणून काय झालं? तो काय नोकरीचा दिवस नव्हे? आतां आपलं सरकार झालं आहे. अखेरच्या दिवशींच नव्हे तर अखेरच्या क्षणापर्यंत आपल्याला काम करायला हवं'. यावर त्यांचा मेंदू, त्यांचं पोट, त्यांचे डोळे, कान, नाक कडकडून टाळ्या देतील नि पंतांना म्हणताल. 'पंत, आतां तुम्हीं मिनिस्टर व्हा. तुम्हीं झक्क बोलतां'. तेवढ्यांत पंत स्टेशनावर येतील. प्लॅटफॉर्मवरच्या आपल्या ठराविक जागेवर जाऊन उभे राहातील. गेलीं पंचवीस वर्षे याच जागीं भेटणारा त्यांचा कंपू आजहि त्यांना इथं भेटेल. मग तपकीरीची बाटली पुढें केली जाईल. सुपारीचीं खांडं फिरविलीं जातील.-

अन् मग पंत आज रिटायर होणार आहेत हें साऱ्यांच्या चटकन् लक्षांत येऊन त्या दिशेनं साऱ्यांच्या तोंडाचा पट्टा सुरू होईल.

मग वीस पंचवीस मिनिटें खडखट्ट खडखट्ट...तीच गति...तींच स्टेशनं... तोच कलकलाट...पंतांच्या हें सारं इतक्या ओळखीचं झालं आहे कीं, ते डोळे मिटूनहि कुठचं स्टेशन आलं आहे...किंवा गाडी नक्की कुठं आली आहे हें सांगूं शकतील. बाहेर न पाहातां स्टेशन ओळखण्याचं पंतांजवळ स्पेशल इंद्रियच आहे जणूं!... महालक्ष्मी स्टेशनच्या आसपास गाडी असतांना पंतांचे डोळे पेंगूं लागतील. गेल्या सदतीस वर्षांची ही संवय त्यांना एकदम कशी मोडतां येणार? चर्चगेट स्टेशनला गाडी लागल्याबरोबर त्यांना आपोआप जाग येईल. स्वतःला न कळत अगदीं एखाद्या यंत्रासारखे ते उठून उभे राहातील, दोन्ही हात वर करून नि भली मोठी जांभई देऊन अंगांतला आळस झाडून टाकण्याचा प्रयत्न करतील, टोपीच्या बाहेर, मांजराच्या शेपटीसारखी लोंबकळणारी शेंडी आंत कोंबतील, डगल्याचीं बटनं कांहींहि कारण नसतांच चाचपून बघतील अन् आपल्या नेहमींच्या कंपूबरोबर चालूं लागतील.

ऑफिसांत गेल्याबरोबर पहिल्यांदा ते कुठलं काम करतील तर तें म्हणजे मस्टरवर इनिशिअल्स करण्याचं. बाबांनो, ऑफिसांत जाऊन नुसतं टिवल्या-

बावल्या करीत बसलं तरी चालेल, पण जर का त्या दिवशीं मस्टरवर सही करायची राह्यली तर त्या दिवसाचा पगार कसा मिळणार? पंतांची इनिशिअल्स करण्याची पद्धतहि अशी बहारदार आहे कीं विचारतां सोय नाहीं! साहेबाचा बाप आला तरी त्याला हीं इनिशिअल्स वाचतां यायचीं नाहींत. अन् यांतच तर खरी गंमत आहे. वाचतां येईल ती सही कसली? पंतांच्या इनिशिअल्सची सही वाळते न वाळते तोंच मागून तो दांतपडक्या घोसाळकर कोकलेल, 'पंत, आज तुमची अखेरची सही ह्या मस्टरवर'. पंत मनाशीं म्हणतील, 'खरंच रे खरंच. आजची आपली ही शेवटची सही नव्हे का?' अन् एकदम त्यांच्या डोळ्यासमोर अंधाराचा थयथयाट सुरू होईल. आपल्या गेल्या छत्तीस वर्षांतील इनिशिअल्स हातांत हात धरून आपल्या भोंवतीं फेर घालीत असल्याचा विचित्र भास त्यांना होईल, अन् घोसाळकराच्या त्या खवचट बोलण्यावर ते नुसते बावळटासारखे हंसतील.

इनिशिअल्स करून पंत आपल्या खुर्चीकडे जायला म्हणून वळतील तोंच त्यांचा साहेब टॉक् टॉक् करीत सेक्शनमध्यें येईल. गेल्या छत्तीस वर्षांप्रमाणंच पंत त्यांना लवून मुजरा करतील. पंतांचा आजचा ऑफिसमधला शेवटचा दिवस आहे हें त्याच्या लक्षांत आहे. पंतांना पहातांच तो म्हणेल, 'मिस्टर दोडके— यू आर रिटायरिंग टुडे?' पंत दातांची कवळी ताणतील नि उत्तरतील 'यॅश् शर, यॅश् शर'. तेवढ्यांत घोसाळकर बोंबलेल, 'पंत, युवर लास्ट सॅल्यूट टू साहेब.' पंत तें ऐकल्या न ऐकल्यासारखं करतील. पुन्हां त्यांच्या डोळ्यासमोर अंधाराचा थयथयाट सुरू होईल. पुन्हां त्यांना घेरी आल्यासारखं वाटेल.

ते खुर्चीवर टेकतात न टेकतात तोंच सेक्शनमधील दोनचार तरुण पोरं त्यांच्याजवळ येतील नि म्हणतील, 'काय दोडके शेट, आज तुमचा अखेरचा दिवस तर! वुइश यू ए हॅपी पोस्ट रिटायरमेंट लाईफ.'

तेवढ्यांत साहेबाचा शिपाई त्यांच्याजवळ येईल नि म्हणेल, 'साहेबांनीं सलाम दिला आहे.' पंत तसेच उठतील नि तुरतुरत साहेबाकडे जातील. साहेब त्यांना छत्तीस वर्षांत प्रथमच बसायला खुर्ची देईल. पण पंत 'दॅटस् ऑल राइट, दॅटस् ऑल राइट' करून तसेच उभे रहातील. गेल्या छत्तीस वर्षांतील

संवय आहे ही. ती सहजासहजीं थोडीच मोडणार आहे ! मग साहेब त्यांना इकडच्यातिकडच्या दोन गोष्टी विचारील, सांगेल नि म्हणेल, ' मिस्टर दोडके, आज तुम्ही कांहीं काम करूं नका. फक्त ती याची केस काढून टाका नि तुमच्याकडे अऊटस्टॅंडिंग असलेल्या लेटर्सचं एक स्टेटमेंट तयार करून हर्डीकराला तुमच्या जागेचा चार्ज घ्यायला सांगा. ओ. के. मिस्टर दोडके, यू कॅन गो ऽऽ. आय् वुइश यू ए लॉंग अँड हॅपी लाईफ ऑफ्टर युवर रिटायरमेंट. ' पंतांना ' थँक यू ' म्हणायचं भान राहाणार नाहीं. ते काकुळतीला येऊन नुसते हंसतील नि मुकाट्यानं बाहेर येतील.

आणि मग पंत आपल्या अनेक सहकाऱ्यांचा निरोप घ्यायला निघतील. बाकीचे लोक आपापल्या कामांत गढून जातील तेव्हां पंत त्यांच्यापाशीं जातील नि म्हणतील, ' जातों. ओळखदेख ठेवा '. आगबोटवाला त्यांना घट्ट मिठी मारील नि आपल्या किरट्या आवाजांत म्हणेल, ' पंत तुमी चॅलला...लई वाएट वाटते आमाला. पन आता तुम्ही फ्री झॅला. ॲमच्यासारखा बॉंडेजमध्यें नाय कुणाच्या '. दहीहंडे त्यांना चहा ऑफर करील. गुळगुळे उगीचच अलतूफालतू गप्पा मारूं लागेल. घोसाळकर अगदीं मनमोकळेपणानं हंसेल.

मग पंत थोडावेळ जागेवर येऊन बसतील नि साहेबानं सांगितलेली ' ती केस वाचूं लागतील. साहेबानं सांगितलं आहे त्या अर्थी आजच्या आज त्यांना ती पुट अप केलीच पाहिजे. केसला दोनशें बारा फोलीओ आहेत. एखाद्या तरुण कारकुनाला ही केस डील करायला दिली तर त्याला ड्रॉफ्ट पुट अप करायला सहा महिने लागतील, हें पंतांना बरोबर ठाऊक आहे. पण पंत अशा कामांत मुरंब्यासारखे मुरले आहेत. आतांची ही केस तर त्यांना पाठ येते आहे. फक्त जरा इकडेतिकडे थोडी चाळायची नि ऑफिस नोट लिहून टाकायची. प्लीज सी अमुक फोलीयो...द पर्टीक्यूलर्स आफ् द् केस आर ॲज अंडर...सबमिटेड फॉर ऑर्डर्स प्लीज... आहे काय नि नाहीं काय !

अधूनमधून पंतांकडे बरेच लोक येऊन जातील. पंतहि नेहमींप्रमाणें काकुळतीला आल्यागत करून त्यांचा निरोप घेतील. तोंपर्यंत लंच अवर होईल.

लंच अवरमध्यें पंत अऊटस्टॅंडींग लेटर्सचं स्टेटमेंट तयार करायला

घेतील. तितक्यांत पांडू शिपाई ग्लासांतून चहा आणून त्यांच्यापुढं ठेवील. तो ते घटाघटा ढोसतील.

अडीच तीनच्या सुमारास गुंड्याभाऊ जोगळेकर त्यांच्याजवळ येऊन म्हणेल, ' दोडकेशेट, आज संध्याकाळीं ऑफिस सुटल्यावर तुम्हांला आम्हीं बुईश करायचं ठरवलं आहे. साहेबानं प्रिसाईड करायला संमति दिली आहे. तुम्हांलाहि उत्तरादाखल दोन शब्द बोलावे लागतील. ' यावर पंत बरेचसे गडबडतील नि ' जोगळेकर, कशाला हें सारं...कशाला हें उगाच ? ' असं बडबडतील. सगळ्या लोकांच्या समोर आपण इंग्रजींतून बोलायचं या कल्पनेनंच त्यांना घाम फुटेल. चक्कर आल्यासारखं होईल. डोक्यांतलीं चक्रं भणभणायला लागतील.

पण हळू हळू त्यांना भानावर यावं लागेल.

घामानं डबडबलेल्या अंगानं ते आगब्रोटवाल्याजवळ जातील नि त्याच्या मदतीनं एक छोटसं भाषण कागदावर उतरून काढतील. ' जंटलमेन्, आय् ऍम् व्हेरी सॉरी...' वगैरे वगैरे...ऑफिस सुटायच्या वेळेपर्यंत त्यांना तें पाठ करावं लागेल. नाहींतर सारंच मुसळ केरांत !

मग ठरलेल्या वेळीं ऑफिस सुटेल.

पंतांच्या विशेष सहवासांतलीं माणसं हेडक्लार्कच्या टेबलापाशीं घोळका करून उभीं राहतील. साहेबाला बोलावणं जाईल. हारतुरे आणून टेबलावर ठेवले जातील. साहेब येऊन मधल्या खुर्चीवर बसेल. त्यांच्या डाव्या बाजूला पंत बसतील. उजवीकडे हेडक्लार्क.

पहिलं भाषण गुंड्याभाऊ जोगळेकरांचं होईल. तो म्हणेल, " कोणत्याहि संकटाला न जुमानतां सतत काम कसं करीत राहायचं हें आम्हांला श्री. दोडके यांनीं शिकवलं आहे...त्यांना दीर्घायुष्य नि आरोग्य चिंतूं. "

टाळ्यांचा कडकडाट...

हळू हळू पंतांच्या डोळ्यासमोर अंधाराचा समुद्र हिंदकळूं लागेल. पाहतां पाहतां त्यांच्या काळ्या कुळकुळीत लाटा काळ्याभोर आकाशाला जाऊन भिडतील.

आपलं आयुष्य किती फुकट आहे या विचारानं त्यांच्या मनाला घेरी

आल्यासारखं वाटेल. एकीकडे झडणाऱ्या भाषणांच्या फैरींतील विशेषणं कानावरून जात असतां ते शरमल्यासारखे होऊन खालीं मान घालतील. त्यांच्या डोळ्यांच्या कडांतून एखाद् दुसरा अश्रूचा थेंबहि गालावर ओघळेल नि डोकीवरच्या इलेक्ट्रिक लाईटच्या प्रकाशांत तो चकाकत राहील. आज नोकरी सोडूं...उद्यां नोकरी सोडूं...सारीं बन्धनं...सारीं बन्धनं झुगारून देऊन आपल्या राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं बाहेर चाललेल्या अदम्य संघर्षात आपण उडी घेऊं हें नोकरीला लागल्या दिवसापासून उराशीं बाळगलेलं स्वप्न आज कांचेच्या बरणीसारखं फुटून तुटून जात आहे या विचारानं त्यांचं अंग शहारेल. टिळक वारले त्या दिवशीं त्यांच्या शवासमोर आपण मनांतल्या मनांत घेतलेली प्रतिज्ञा...गांधींनीं चंपारण्याचा लढा सुरू केला तेव्हां घेतलेली शपथ...दांडी यात्रेच्या वेळीं लिहून ठेवलेला नि अखेरपर्यंत आपल्याच ड्रॉवरमध्यें राहिलेला तो राजीनामा...गेलीं छत्तीस वर्षं पंत स्वतःच्या मनाशीं झगडत होते. झुंज देत होते. नाहीं...असली घाणेरडी...पदोपदीं अपमानानं बरबटलेली ही कारकुनी आपण यापुढें क्षणभरहि करायची नाहीं...पिढ्यानुपिढ्या आपल्यावर लादलेलं हें बंधन झुगारून आपण उघड्या मैदानांत यायचं...आपल्या चाळीस कोटि भावंडांच्या खांद्याला खांदा लावून लाठ्या खायच्या...गोळ्या झेलायच्या... तुरुंगवास पत्करायचा...पण एकदां घाण्याला रगडलेला हा बैल घाण्याच्या दांडीपासून कधींच सुटला नाहीं. छत्तीस वर्षं...छत्तीस वर्षं तो तसाच गोल गोल फिरत राहिला...बेचाळीसच्या लढ्याच्या वेळीं चौऱ्याहत्तराच्या घरांत असलेल्या एका म्हाताऱ्यानं सिंहगर्जना केली तेव्हां आपण अगतिक होऊन मान मोडेतोडेपर्यंत हें गटार उपशीत बसलों होतों. अखेर विशाल जीवनाच्या या मुक्त स्वप्नावर आपल्या क्षुद्र...हीन...दरिद्री...जीवनानं मात केली होती. बायकापोरांचा हलकल्लोळ...प्रॉव्हिडंट फंडाच्या पैशांचा खळखळाट...जुन्या पिळवटलेल्या, कुजत चाललेल्या कागदांचा कुबट वास, धोतरावर सांडणारी शाई...ती पिणारा ब्लॉटींग पेपराचा तुकडा...काय, काय केलं आपण आपल्या पंचावन्न वर्षांच्या आयुष्यांत?...जन्माला आलों...वाढलों...लग्न केलं...पोरं झालीं... खर्डेघाशी केली...चहा प्यायलों...चणे खाल्ले...नि नुसत्या लंब्याचवड्या गप्पा झोडल्या...

पंतांच्या मनांत वादळ उभं राहील. विजा कडकडूं लागतील नि डोळ्यांच्या कडांतून पावसाचे ओघळ वाहूं लागतील. विजेच्या दिव्याच्या प्रकाशांत चमकणाऱ्या त्या पागोळ्या पाहून पंतांना निरोप द्यायला आलेले लोक म्हणतील ' काय बेस्याला नोकरीची हांव ! पंचावन्न वर्षे उलटलीं ...छत्तीस वर्षांची सव्हींस झाली, तरी वखवख आहेच अजून ! एकंदरींत आपल्या लोकांची टेंडन्सीच... ' पंत हें ऐकतील नि ढसढसां रडूं लागतील... गुंड्याभाऊ जोगळेकरांच्या भाषणाचा एकहि शब्द त्यांच्या डोक्यांत शिरणार नाहीं....

आपल्याला निरोप द्यायला म्हणून आलेल्या लोकांची गर्दी, वारा प्यालेल्या घटोत्कचासारखी अक्राळविक्राळ रूप धारण करून आपल्याला खायला उठते आहे असा भास क्षणभर पंतांना होईल. गेलीं छत्तीस वर्षे ज्या टेबलखुर्च्यांच्या संगतींत काढलीं त्या टेबलखुर्च्या दांत विचकून नि एकमेकांच्या हातांत हात घालून आपल्या प्रेताभोंवतीं थयथया नाचत आहेत असं भयंकर दृश्य त्यांच्या नजरेसमोर थरथरूं लागेल. एडलजी कालापेसी आपल्याकडे पाहून अबुबकर करीमखानाच्या कानांत कसली तरी फाजील कुजबुज करीत असल्याचं दृश्य त्यांच्या चोरट्या नजरेंत भरेल.

अन् मग एकदम टाळ्यांचा कडकडाट होईल. कांहींहि कारण नसतांना पंतांना तो टाळ्यांचा आवाज ऐकून पंचवीस वर्षांपूर्वी पाहिलेल्या स्वयंवर नाटकाच्या वेळीं गंधर्वांच्या गाण्यांना पडलेल्या टाळ्यांची आठवण होईल. मनांतल्या मनांत ते स्वयंवरांतलं एखादं गाणंहि मोडक्यातोडक्या सुरांच्या आधारानं गाऊं लागतील. क्षणार्धांत अगदीं पिन्-ड्रॉप सायलेन्स होईल. गुंड्याभाऊ जोगळेकर पायांत शेपूट घालून ' ही ही ' करीत एका कोपऱ्यांत जाऊन उभा राहील. व कुठूनतरी कपबशांचा आवाज आल्यासारखं वाटेल.

पंतांचा साहेब बोलायला उभा राहील. पहिलीं दोनतीन मिनिटं तो कांहींच बोलणार नाहीं. कारण काय बोलावं...कसं बोलावं हेंच त्याला समजणार नाहीं. ऑफिसच्या कामांत तो वाकबगार असला तरी चार लोकांसमोर उभं राहून ' वक्तृत्व ' का काय म्हणतात तें करण्यांत तो शुद्ध दगड आहे. तरी पण सगळेजण आ वासून त्याच्याकडे मोठ्या कौतुकानं पहात राहतील. थोड्या

वेळानं तो आपली नेकटाय नीट करण्याचं ढोंग करील...उगीच खांकरेल नि आडवी पडत चाललेली आपली जीभ कशीबशी वर उचलून 'जं...ट...ल...मे...न' एवढा एकच शब्द उच्चारील. पुन्हां त्याच्या डोळ्यापुढं कोऱ्या कागदांचा एक ढीगच्या ढीग येऊन त्याला वेडावून दाखवील. दिवसभर हाताखालच्या कारकुनांना लाथा मारतांना घाणेरड्या, विद्रूप, बेढब शब्दांची वाटेल तशी मदत घेणारा हा 'सायबाचा बाप' आतां मुक्या मेंढरासारखा, शब्द धुंडाळीत अंतराळांत नजर लावून बसेल. कारण जन्मभर तो ज्या शब्दांची संगत करीत आला त्याच्या अगदीं उलट शब्द, खोटंखोटंच का होईना, पण वापरण्याचा भयंकर प्रसंग आज त्याच्यावर येऊन पडला आहे. पंतांविषयीं एक अक्षरहि चांगलं काढायची त्याच्या मनाची तयारी नाहीं. उलट मागं तीनचार वेळां पंतांना बढती देण्याचा चान्स आला होता तेव्हां याच नंदीबैलानं मध्यें खो घालून पंतांच्या पोटावर पाय आणलेला आहे. जन्मभर लाथा झाडून झाडून झालेल्या जखमांवर मलमपट्टी करण्याच्या मिषानं तो पंतांचे गोडवे गाण्यासाठीं आज उभा राहिला आहे.

अन् पंतांना याची पुरेपूर जाणीव आहे. हळूहळू पंतांचा साहेब बोलूं लागेल. जो जन्मभर आपल्या अंगावर वखवखल्यासारखा येत होता तो हा आपला साहेब, सॅकरीनच्या वड्यांसारखा मिष्टास बोलूं शकतो हें पाहून पंत आनंदानं मिशा फेंदारतील.

'पंतांसारखा कष्टाळू, प्रामाणिक, मन लावून काम करणारा, आपल्या चुका झाल्या तरी निःशंकपणें कबूल करणारा, विनयी स्वभावाचा, आज्ञाधारक, निर्मळ मनाचा...' तीन मैल लांबीचीं गोड गोड विशेषणं पंतांच्या मागं हात धुवून लागतील. आपल्या अंगावर मूठभर मांस चढल्याचा पंतांना भास होईल. चोरट्या नजरेनं ते आपल्या साहेबाकडे पाहून प्रेमळपणें हंसण्याचा प्रयत्न करतील. आपल्याला निरोप द्यायला आलेल्या घोळक्यांतील प्रत्येकजण आपल्याकडे मोठ्या कौतुकानं पाहातो आहे या जाणीवेनं पंतांचं अंग शहारून निघेल. मग आपणहून ते एखाद्या नवऱ्या मुलीसारखे लाजून मान खालीं घालतील नि मिशींतल्या मिशींत हंसतां हंसतां डोक्यावरची टोपी नीट करण्याचा उगीच आव आणतील.

अन् मग एकदम कुठूनसा टाळ्यांचा कडकडाट ऐकूं येईल. पंत एकदम भानावर येऊन तारवटलेल्या डोळ्यांनीं आजूबाजूला नजर फेंकतील. पटकन् त्यांच्या लक्षांत येईल कीं, साहेबाचं तें गोड भाषण अखेरीस संपलं आहे. एखादी मोठी लढाई मारण्याच्या तोऱ्यांत साहेब खुर्चीवर बसून भंवतालीं उभ्या असलेल्या मेंढरांकडे पाहात राहील.

मग कुणीतरी पुढं होईल नि पंतांच्या पाठीवर हात ठेवून म्हणेल, ‘ पंत, आतां तुम्हीं दोन शब्द बोला. ’

पंतांच्या डोळ्यापुढें हजारो...लाखो...रंग थयथया नाचूं लागतील. शेंकडों गॅसच्या बत्त्या आपल्या भंवतीं फेर धरून नाचताहेत नि झिंज्या पिंजारून खी खी खी हंसताहेत असा भास त्यांना होईल. पाहातां पाहातां त्यांचं अंग घामानं थबथबून निघेल. टोपीच्या बाहेर येऊन पंतांच्या निर्वाणाचा सोहळा पहाणारी त्यांची शेंडी मुकाट्यानं झपझप आंत शिरेल अन् गुडुप् करून बसेल.

आगगाडीच्या इंजिनानं वाफ सोडावी तसा पंत एक दीर्घ निश्वास सोडतील नि आपल्या लटपटत्या पायावर कसेबसे उभे राहातील. क्षणार्धांत जिकडे तिकडे स्मशानशांतता पसरेल. पंत आ वासून समोरच्या मेंढरांच्या कळपाकडे पाहातील अन् मनांतल्या मनांत किंचाळतील.

त्यांच्या तोंडांत लाळेच्या लाटा निर्माण होतील. कुणीतरी येऊन आपला गळा दाबतो आहे असं त्यांना वाटेल. घशाला कोरड पडेल. जीभ आडवी पडण्याची वेळ येईल.

पंत बोलण्यासाठीं तोंड उघडण्याची कोशीस करतील, पण तसं करणं आपल्या कुवतीबाहेरचं आहे असं त्यांना वाटेल. भेदरलेल्या बकऱ्यासारखे ते आ वासून इकडे तिकडे पहाण्याचं ढोंग करतील...

पंता...पंता...पंता...अरे बोल कीं...जरा तोंड उघड...हं...

अन् मग पंतांची जीभ उठून त्यांच्या टाळ्याला लागेल.

पंत म्हणतील, ‘माय ब्रदर्स......मला बोलतां येत नाहीं. मी तुमच्या या सौहार्दाबद्दल अत्यंत आभारी आहे. आजपासून......’

अन् मग पंतांचा गळा दाटून येईल. आंतून...आंतून कुणीतरी आपल्याला दाभण टोंचीत आहे असं त्यांना वाटेल. लोकमान्य टिळक...

महात्मा गांधी...नथूराम गोडसे...नारायण आपटे...लाला लजपतराय...स्वामी श्रद्धानंद...डॉक्टर मुंजे...मटण मार्तंड...हे सारे आपापल्या चितेंतून उठून, आपल्याकडे पाहून मोठमोठ्यानं हंसत असल्याचा भास त्यांना होईल. कुणी तरी...कुणी तरी म्हणेल...कारकुंडा...साला कारकुंडा तो कारकुंडाच...ही ही ही ही...ही ही ही ही...

पंत मटकन् खालीं बसतील. त्यांच्या मस्तकाच्या शिरा ताड्ताड् उडूं लागतील...पंता...ए पंता...ए...ही ही ही......ही ही ही...

अन् मग एकदम टाळ्यांचा कडकडाट होईल. साहेब तो टेबलावरचा हार उचलून चटकन् पंतांच्या गळ्यांत घालील. त्यांच्या हातांत एक तुरा देईल नि पंत नको नको म्हणत असतां त्यांचा उजवा हात धरून तो गदगदा हलवीत म्हणेल, 'वुईश यू ए व्हेरी व्हेरी हॅपी अँड लॉंग लाईफ आफ्टर रिटायरमेंट.'

आपल्या 'प्रेमळ' साहेबाच्या तोंडचे हे शब्द ऐकून पंतांचा ऊर भरून येईल नि ते अक्षरशः ढळढळा रडूं लागतील.

धोतराच्या सोग्यानं डोळे पुसून पंत इकडे तिकडे पाहातील तेव्हां भंवतालीं दबा धरून बसलेला तो मेंढ्यांचा कळप पांगत असल्याचं त्यांना दिसेल.

मग चहापाणी...शेवचिवडा...खारीं बिस्किटं...ओळखदेख ठेवा... साब मेहरबानी रखो...रिमेम्बर द पूअर मॅन...केम् बावाजी...हा हा हा हा...

पंत, आजपासून तुम्ही फ्री झालांत...पंत, फ्रॉम टु डे देअर वुइल बी नो बॉडी टु किक यू...पंत आजपासून तुम्हीं तुमचे राजे... दिल चाहेल तेव्हां उठावं...चहा प्यावा...टाईम्स वाचावा....

अन् खरंच—

दुसऱ्या दिवशीं पंत थोडेसे उशीरांच उठतील. पण त्यांना चुकल्याचुकल्यासारखं वाटेल. असंच उठावं नि सारखं धांवत...धांवत धांवत सुटावं, असं त्यांना वाटेल. नऊ सदतीसची गाडी चुकली...मग आतां याच्यामागून फास्ट गाडी कोणती ?...अरे जाऊं दे हो...तिच्या मागच्या स्लोनं जाऊं...नाहीं तरी संध्याकाळीं लेट बसायचंच आहे....पंत उठतील. तोंड धुतील. चहा पितील नि टाईम्स चाळीत बसतील. पहिल्यांदा ते शेवटचं जाहिरातीचं पान वाचतील...

आँ...वाँटेड ए क्लार्क...वुईथ एक्स्पिरियन्स्...आँ...स्केल...७०...५।२...८०...अरे वाऽऽ...

मग पंत थोडा वेळ आपल्या गरीब...दळभद्या...संसाराविषयीं विचार करीत बसतील. लोकमान्य टिळक...महात्मा गांधी...लाला लजपतराय...नथूराम गोडशा...नारायण आपट्या...मोतीलाल नेहरू...यांचा जथा भर्रकन् त्यांच्या नजरेसमोरून सरटकेल. पण...

पंत बाळ्याला हांक मारतील नि म्हणतील, ‘ अरे बाळया, एक मोठा कोरा कागद नि दौतटांक दे रे जरा...’

पंत आजपासून तुम्हीं फ्री झालांत... पंत, आजपासून तुम्हांला कुणी लाथा मारणार नाहीं...पंत...पंत...

अरे जा...जा...आले आहेत मोठे ‘ फ्री झालांत ’ म्हणणारे !

बस् करा तुमची वटवट...बस् करा...बस् करा...

अन् या साऱ्या कोलाहलाची पर्वा न करतां, स्वतंत्र झालेले पंत वयाच्या पंचावन्नाव्या वर्षी पुन्हां अर्ज खरडूं लागतील...

‘ आय बेग टु अप्लाय... ’

१९५१

* * *

: ७ :

# काळोख

एखाद्या अधम माणसाच्या काळ्या हृदयानंहि ज्याचा काळा रंग पाहून मान खालीं घालावी असा किर्र काळोख आसमंतांत दाटून राहिला होता. आधींच कृष्णपक्षांतली रात्र नि तशांत आकाश ढगाळलेलं. पायाखालची वाट सरावाची होती म्हणूनच जेमतेम काठी टेकत टेकत तो चालला होता एकटा. तालुक्याच्या ठिकाणीं दिवसभर भीक मागत हिंडावं, मिळेल त्या चिल्लरींतून एखादा आणा बाजूला काढून दादा करमकराच्या हॉटेलांत जावं नि बाजूला काढलेल्या त्या आणेलीचा पोराबाळांसाठीं भजाचा चुरा घेऊन दिवेलागणीच्या सुमारास घाटी चढायला लागावं असा त्याचा गेल्या कित्येक वर्षांचा खाक्या होता. जन्मतःच त्याचा एक पाय थोटा होता त्यामुळं चालतांना त्याला जहाजासारखे हेलकावे खात खात चालावं लागे. डावा हात मनगटापासून तुटलेला असल्यामुळं काठी टेकण्यापासून खाकेंतली झोळी संभाळण्यापर्यंत त्याचीं सर्वच कामं उजव्या हाताला एकट्यानं करावीं लागत. तालुक्यापासनं त्याचं गांव एका कोसाच्या अंतरावर होतं न् तेवढं अंतर कापायला त्याला दोन एक तास सहज लागत. घाटी चढतां चढतां मधेंच दमून भागून तो पिंपळाच्या पीरापाशीं टेकला तर यापेक्षांहि थोडा अधिक वेळ लागे.

तशांत आज नुकताच पाऊस पडून गेला होता. झाडांच्या पानापानांवरून सांकळून राहिलेल्या पागोळ्या ठिबकूं लागल्या होत्या. नुकत्याच भाजलेल्या आसपासच्या शेतांतून ओल्या मातीचा खरपूस वास येत होता. पायाखालची

जमीन निसरडी झाल्यामुळं त्याला जपून पावलं टाकावीं लागत होतीं. आतां पुन्हां पाऊस यायच्या आंत आपण घरीं पोंचलों म्हणजे खैर झाली असा हिशेब तो स्वतःशीं मांडीत होता. आज पिंपळाच्या पीरापाशीं थांबायचं नाहीं असा बेत करून तो आपल्या परीनं झपाझप पावलं टाकण्याची धडपड करीत होता. पण जेव्हां तो त्या पीरापाशीं येऊन पोंचला तेव्हां त्याला इतकी धाप लागली होती कीं, क्षणभर कां होईना पण विश्रांति घेतल्यावांचून त्याला गत्यंतरच उरलं नव्हतं. पीराच्या थडग्यावर घातलेल्या हाराची कलाबूत एका लहानशा दिवटीच्या प्रकाशांत तकाकत होती. पायथ्याशीं लावून ठेवलेल्या उदबत्त्यांचा जुडगा संपत आला होता. पीरापाशीं येतांच त्यानं आपल्या कानाला लावून ठेवलेली एक जळकी विडी काढली नि ती त्या दिवटीवर शिलगावून तो क्षणभर तिथंच एका दगडावर बसला.

रातकिड्यांची किरकिर नि पाणथळींत डरॉंव डरॉंव करणाऱ्या बेडकांची ओरड याखेरीज दुसऱ्या कशाचीच जाग आसपास नव्हती. नाहीं म्हणायला घाटमाथ्याच्या पायथ्याशींच लागून असलेल्या शिगोटी गांवांतील वस्तीचे दोनचार दिवे तेवढे लुकलुकतांना तिथून दिसत होते. पीराच्या थडग्यापासून शिगोटी बरोबर अडीच फर्लांगांवर होती नि तिथून जवळ जवळ पाऊण मैलावर त्याचं घर होतं.

पिंपळाच्या पीराच्या दगडावर बसून त्याला थोडा वेळ होतो न होतो तोंच, तो आतां जी घाटी चढून इथवर आला होता तिच्या दिशेनं बैलांच्या गळ्यांतील घंटांचा आवाज त्याच्या कानावर आला. त्यानं बसल्या जागेवरूनच मान उंचावून खालीं नजर टाकली तेव्हां त्याला एक सारवट गाडी घाटी चढून येत असल्याचं दिसलं. तिच्या पुढच्या बाजूला लावलेला कंदील त्या काळोखांतून एकटाच पुढंपुढं सरकत असल्यासारखा दिसत होता.

ती गाडी आणखी जवळ आली तेव्हां वाजवीपेक्षां अधिक प्रमाणावर माल तिच्यावर लादलेला दिसत होता. गाडीवाला एकसारखा 'हूँ हाँ हूं ऽ ऽ' करून बैल ढुसकीत होता. एवढं ओझं घेऊन ती घाटी चढतां चढतां त्या बापड्या जनावरांच्या तोंडाला फसफसून फेंस येत होता. तरी पण गाडीवाला त्यांना पुढं पुढं दामटीतच होता.

'हंब्या...हा हाऽऽ अरं चाल कीं तिच्या भनंऽऽ!'

अंगांत असेल नसेल तेवढा जोर काढून बैल गाडी ओढीत होते. सरळ रस्ता असता तर त्यांनीं गाडी एव्हांना शिगोटीला सहज नेली असती. पण जिराफाच्या मानेसारखी ही सुळकी घाटी, मालकानं कितीहि हंब्या हंब्या केलं नि ढुंगणांत चाबकाची काठी खुपसली तरी सहजासहजीं चढून येणं त्यांना जमण्यासारखं नव्हतं. तशांत रस्ता निसरडा झालेला नि पावलोंपावलीं वीत वीत खोलीचे खड्डे पडलेले.

बरं, गाडीवाल्याचंहि एका अर्थी बरोबर होतं. गाडी अगदीं चढणीच्या डोईवर आली असतांना त्याला ती मध्येंच थांबवतांहि येणं शक्य नव्हतं. पिंपळाच्या पीराशीं थोडी सपाटी होती तिथंच काय तो ती थांबवूं शकला असता. पण तिथपर्यंत तर कसंहि करून गाडी दामटायला हवी? नाहींतर सगळाच सत्यानाश व्हायचा.

पीरापाशीं तो जिथं बसला होता तिथून ती गाडी आतां त्याला स्पष्ट दिसूं लागली होती. तो टक लावून तिच्याकडे सारखा पहात राहिला होता.

इतक्यांत गाडीवानानं कासरा सोडून जोतावरून खालीं उडी मारली. अंगातलं कुडतं काढून गाडींत फेकलं नि गाडीच्या मागच्या अंगाला होऊन दोन्ही हातांनीं तो उजवीकडलं चाक ढकलूं लागला.

'हँऽऽ हँऽऽ च्यॅक् च्यक च्यॅक् च्यक हंब्याऽऽ हॅऽऽ हीऽऽ'

बैलं आपल्या परीनं शिकस्त करीत होतीं, पण गाडी पुढं हलेनाच.

पीराच्या दगडावर बसून तो हें सारं पहात होता. गाडीवानानं जोत सोडून खालीं उडी मारली तेव्हां त्याची जी पूर्ण छायाकृति त्याला दिसली होती तीवरून तो तीनचार गड्यांना सहज भारी पडण्याइतका असामी असावा अशी त्याची खात्री झाली होती.

'हंब्या...हीऽऽहंब्या...ही...'

पण गाडींत ओझं तर इतकं लादलेलं होतं कीं, कदाचित् बैलांना तें ओझं अनावर होऊन त्यांचा जरा तोल गेला असता तरी धडगत नव्हती. उभ्या घाटमाथ्यावरून गाडी खालीं कोसळली असती.

या प्रसंगाच्या नुसत्या कल्पनेनंच त्याच्या अंगावर शहारे आले नि

विडीचं थोटूक जळत जळत बोटापर्यंत आलं तरी त्याला त्याचं भान उरलं नाहीं.

' हिऽऽरी हिऽऽरी...हँऽऽहंव्या...हँ...'

खड्ड्यांत रुतून बसलेलं चाक बाहेर काढण्याची कोशीस गाडीवान आपल्या परीनं करीत होता. पण गडी कितीहि आडदांड असला तरी एकट्या-दुकट्याला झेंपण्याजोगं असं तें काम नव्हतं. त्यांतल्या त्यांत नशीबाचा भाग एवढाच कीं गाडी जशी पुढं सरकत नव्हती तशीच ती मागंहि हालत नव्हती.

हातांतलं विडीचं थोटूक लांब भिरकावून त्यानं आपली काठी उचलली नि तरसासारखा पाय फरफराटवीत तो त्या गाडीजवळ आला.

' काय पाव्हनं, कुठं जायचं ? ' त्यानं गाडीवानाला विचारलं.

त्याचा तो प्रश्न ऐकून गाडीवानानं एकदम दचकल्यासारखं केलं नि किलकिल्या नजरेनं तो त्याच्याकडे क्षणभर पहातच राहिला. निर्मनुष्य अशा त्या घाटमाथ्यावर, अशा बिकट वेळीं माणसाचा आवाज कानीं पडतांच त्याला थोडं बरं वाटलं. पण ज्याच्याकडून मदतीची अपेक्षा करावी तो माणूस पांगळा आहे हें पहातांच गाडीवानाचा चेहरा खारकन् उतरला.

' कुठल्या गांवचं व्ह पावनं ? '

' इथलंच. शिगोटीचं. हीऽऽ हंव्या...हीऽऽ '

गाडीवानाचं शरीर लोखंडाचं ओतल्यासारखं वाटत होतं. शिसवी लांकडाला तेल लावावं तशी घामानं भिजलेल्या त्याची छाती नि पाठ दिसत होती. वर खोवून घेतलेल्या धोतरांतून त्याच्या मांडीच्या टरारलेल्या बेडक्या दिसत होत्या. दंडाचे गोळे भगभगले होते.

' हीः...हीः... ' त्यानं पुन्हां चाकाला हात घातला. ओंठ दांताखालीं दाबून धरले. श्वास छातीच्या पिंजऱ्यांत बंदिस्त करून टाकला.

अरं हीः...हीः...हीः रं हंव्या... '

त्याची ती धडपड त्याला पहावत नव्हती. पण यापेक्षां अधिक तोहि कांहीं करूं शकत नव्हता.

असेल नसेल तेवढा जोर काढून त्यानं चाक वर उचलायचा प्रयत्न केला. या साऱ्या धकाधकींत बैलांच्या गळ्यांना इतकी तात लागली होती कीं

त्यांच्या तोंडांतून फेंस येत होता. त्यांच्या डोळ्यांचीं बुबळं बाहेर येतात कीं काय अशी भीति वाटत होती.

'हंव्या ऽऽए ऽऽ...'

गाडीवानानं पुन्हां एकदां आरोळी ठोकली. पुन्हां त्याच्या दंडाचे स्नायू ताणले गेले.

अन्...अन्...काय आश्चर्य?...काय आश्चर्य?...खड्डयांत रुतून बसलेलं तें गाडीचं चाक वर उचललं गेलं. गाडी किंचित् पुढं ओढली गेली.

गाडीवानानं तिच्या मुसकऱ्यावरचे हात काढले नि कपाळावरचा घाम बोटांनीं झाडीत तो एखाद्या राक्षसासारखा श्वासोच्छवास करूं लागला.

पण एकच क्षण...एकच क्षण...

मोठ्या अभिमानानं त्यानं त्या भिकाऱ्याकडे पाहिल्यासारखं केलं नि दोन्ही हात एकमेकांवर झाडीत तो गाडीच्या पुढच्या अंगाला सरकूं लागला, इतक्यांत गाडी पुन्हां मागं आली. पण यावेळीं तिचं चाक खड्डयांत रुतूनहि बसलं नाहीं.

आतां?...आतां काय करायचं?...

गाडी मागं हलूं लागलेली पहातांच गाडीवान हबकला. क्षणभर त्याला काय करावं हें सुचेनाच.

एक कर्कश किंकाळी मारून निमिषार्धात त्यानं पुन्हां मागल्या अंगाला झडप घातली नि घाटीच्या उतरणीवरून कोसळूं पाहणारी ती गाडी आपल्या बाहूंनीं रोंखून धरण्याचा आटोकाट प्रयत्न तो करूं लागला. पण माणसाचं अंग लोखंडासारखं दिसलं तरी तें हाडामांसाचंच बनविलेलं असतं तोंपर्यंत आपल्या आवाक्याबाहेरचं काम तें करूं शकणार आहे थोडंच!

आपल्या दोन बाहूंना हें काम झेंपण्यासारखं नाहीं हें पहातांच गाडी-वानानं आपलं अंग सरळ तिच्या चाकांखालीं झोंकून दिलं. गाडी जागच्याजागीं थांबली. पण पुढें काय करायचं?

गाडीचीं दोन्हीं चाकं तसूतसूनं त्याच्या लुसलुशीत मांसांत शिरूं लागलीं होतीं.

बाजूलाच हें सारं पहात उभ्या असलेल्या त्या पांगळ्याला कण्हत कुथत त्यानं जवळ बोलावलं नि म्हटलं, ' असंच...झपझप घाटी उतरून शिगोटीला जा नि अर्जुना भुसाऱ्याचं...घर विचारा...म्हणावं, झटदिशी माणसं घेऊनशानी पीरापाशीं या...आईगऽऽ...अं...अर्जुना...भुसारी...बरं का ? म्हणावं, तुमचा ल्योक...आईग...ऽ'

गाडीवानाचं पुरतं बोलून व्हायच्या आंतच त्या पांगळ्यानं खांद्यावरची झोळी खालीं टाकली नि झपाझप पावलं टाकीत तो घाटी उतरूं लागला. जितक्या जोरानं चालतां येईल तितक्या जोरानं तो चालत होता. आपल्या थोट्या पायाचीहि तो आज कांहीं गय करीत नव्हता.

गाडीवानाचं तें दृष्ट लागण्यासारखं शरीर पाहून...ती पहाडी हिंमत पाहून त्याची छाती दडपून गेली होती. अशी बैलासारखी ताकद माणसांतहि असूं शकते हें त्याच्या दुबळ्या शरीराला ठाऊक नव्हतं...

झपाझप घाटी उतरून तो शिगोटीला आला नि एकदम मुसळधार पाऊस कोसळूं लागला. आकाशाकडे पाहून त्यानं कपाळाला हात लावला नि तो उजवीकडच्या एका वाडींत शिरला.

जिकडेतिकडे अगदीं किर्रर्र काळोख दाटला होता. डोळ्यांत बोट गेलं असतं तरी तें दिसलं नसतं अशी त्याची शान होती. वाडीच्या अगदीं आंतल्या भागांत एक घर दिसत होतं. त्याचीं खिडक्यादारं बंदच होतीं. खिडक्यांच्या तावदानांतून चोरून बाहेर पडणारा लालटनचा अंधुक उजेड त्याला आधारा-सारखा वाटत होता.

काठी टेंकीत टेंकीत तो घरांत फाटकापाशीं येऊन पोंचतो न पोंचतो तोंच दहा–बारा गांवठी लांबोळीं कुत्रीं त्याच्याभोंवतीं जमा झालीं नि आपल्या किरक्या आवाजांत त्याच्यावर भुंकू लागलीं.

तेवढ्यांत कुणीतरी खिडकींतून बाहेर डोकावून पाहिलं.

' अर्जुना...अर्जुना भुसारी....'

' ऑं ? कोन रं या वख्ताला ?

' आरं भुसारी हतंच असतो काय ?'

खिडकींतून डोकावणाऱ्या त्या व्यक्तीनं हातांतला कंदिल किंचित् वर करून फाटकाबाहेर नजर टाकली. पण फाटकाबाहेर एका भिकाऱ्याखेरीज दुसरं कुणी नाहीं हें पहातांच तिनं पुन्हां जी खिडकी धाड्दिशी लावून घेतली ती तो भिकारी किती ओरडला तरी उघडली नाहीं.

अखेर हताश होऊन तो मागं वळला. तो वाडीच्या अगदीं बाहेर पडेपर्यंत ती गांवठी कुत्र्यांची टोळी त्याच्या मागं लागली होती.

वाडीबाहेर आल्यावर त्यानं पुन्हां एकदां त्या घराकडे नजर टाकली नि क्षणभर इकडचा तिकडचा मागोवा घेऊन तो डावीकडे वळला.

अशींच सात-आठ घरं त्यानं धुंडाळलीं. पण त्याचं बोलणं ऐकून घ्यायच्या आंतच त्याला तिथून पिटाळण्यांत आलं.

एव्हांना पाऊस अक्षरशः झपाटल्यासारखा झाला होता. मोठ्या बोरा-एवढा एकेक थेंब पडत होता. गडगडत होतं काय...विजा लखलखत होत्या काय...आतां त्यानं एकदांच प्रयत्न करायचं ठरविलं. भिजून ओल्याचिंब झालेल्या आपल्या कुडत्यावरचं पाणी झटकल्यासारखं करून तो समोरच्या शेताडींत घुसला नि त्याच्या उजव्या अंगाला एक खोपट दिसत होतं तिथं येऊन ठाकला.

'आरं हाय का कुनी घरांत ?'

घरांत दिवाबिवा कांहीं दिसत नव्हता. बहुधा एव्हांना सगळीकडे नीजा-नीज झाली असावी. नाहीं म्हणायला, दाराला लागूनच निजलेला कुणी म्हातारा मात्र अधूनमधून खोंकत होता.

'ओ ऽऽऽ... घरांत कुनी हाय का ?'

क्षणभर कांहींच हालचाल नाहीं. थोड्या वेळानं तो खोंकणारा म्हातारा उठला नि त्यानं दार उघडलं.

'अर्जुना भुसाऱ्याचं घर कुठल्या अंगाला आलं ?'

'आँ ?'

'अर्जुना भुसारी....'

म्हाताऱ्यानं डोळे बारीक करून त्याच्याकडे पाहिलं नि आपल्याशीं

बोलणारा हा प्राणी म्हणजे एक भिकारी आहे हें पहातांच तो मिस्किलपणानं स्वतःशींच हंसला.

‘ का रं बाबा ? तुम्हां लोकांना भीक मागायला दुसरा अवसरच न्हाई का रं मिळत ? ’

‘ अं ?...कुठल्या अंगाला ? ’

‘ हां...हां...त्येनं तुला आज मेजवानी व्हाडून ठिवलेली दिसतेय ?... आँ...आरं लेका, कापल्या बोटावर मुतनार न्हाई त्यो...त्यो...अर्जुना...’

‘ हां...त्येचं घर कुठल्या अंगाला ? ’

म्हातारा नंदीबैलासारखी मान हालवून पुन्हां एकदां मनमुराद हंसला नि म्हणाला, ‘ जावा...असंच जावा या रस्त्यानं पुढं...पयलं लागल त्येचं...’

अन् म्हाताऱ्याचं पुढचं कांहींच बोलणं ऐकून न घेतां तो पुढं चालूं लागला. आपला थोटा पाय फरफटवीत चालतां चालतां तो एव्हांना एवढा भागला होता कीं, क्षणभर कुठं त्याला निवांतपणें बसायला मिळालं असतं तर हवं होतं. पण आतां निवांतपणें बसण्याचा विचारहि करण्यापुरता वेळ उरलाच होता कुठं मुळीं ?

थोडा वेळ चालल्यानंतर त्याला एक घर लागलं. त्याला दुरून येतांना पाहिल्याबरोबरच आसपासची कुत्रीं जीव तोडून भुंकायला लागलीं होतीं.

‘ थोडं दारं उघडाल का ? ’ त्यानं पुन्हां आरोळी घरली.

दार उघडलं गेलं. एक कैंसाळ छातीचा, ढेरपोट्या गृहस्थ बाहेर आला.

‘ काय ? भीक मागायला दुसरी वेळ गावत नाहीं तुम्हां लोकांना ? हराम लेकाचे ! पावसाचा नेम साधून खुराड्यांतल्या कोंबड्यांबिंबड्या होलपाटायच्या असतील ! ’

त्याला पुरतं बोलूं देण्याच्या आंतच, त्या गृहस्थानं आपल्या नोकराला बोलावलं नि बकोट्या धरून त्याला बाहेर काढलं.

अंगावरचे कळकट कपडे भिजून ओलेचिंब झालेले...पाय चिखलांत बरबटलेले...मागं कुत्रीं लागलेलीं...अशा स्थितींत तो पुन्हां रस्त्यावर आला.

त्यानं पुन्हां एकदां अर्जुना भुसाऱ्याच्या त्या कौलारू घराकडे नजर टाकली नि मानेला जोराचा झटका देऊन तो पचकन् जमिनीवर थुंकला.

त्याचं अंतरंग नुसतं पेटून निघालं होतं. कातडींतून झिरपणारं पावसाचं पाणी संतापाचा वन्हि अधिकच चेतवीत होतं.

...काळोखांतून वाट काढीत काढीत तो कसाबसा घाटीवर येऊन पोंचला. पिंपळाच्या पीरापाशीं येतांच त्यानं गाडीवानाला साद घातली. पण त्याला उत्तर आलं नाहीं. पीराजवळची ती दिवटी केव्हांच विझून गेली होती. अधूनमधून विजा चमकत होत्या तेवढाच काय तो उजेड.

धांपा टाकीत टाकीत तो कसाबसा गाडीजवळ येऊन पोंचला नि त्यानं गुडघ्यावर उभं राहून वांकून पाहिलं.

तेवढ्यांत विजेचा एक लोळच्या लोळ कोसळला नि डोळे दिपवून टाकणाऱ्या लखलखाटांत त्याला दिसलं....

गाडीचीं दोन्ही चाकं त्याच्या लुसलुशीत मांसांत शिरलीं होतीं. एक मानेकडच्या भागांत शिरलं होतं नि दुसरं त्याच्या उरापोटांत घुसलं होतं. जीभ बाहेर आली होती. हातपाय ताठरले होते.

बैलांच्याहि गळ्यांना तात लागून ते गतप्राण झाले होते. त्यांचे डोळे बाहेर लोंबत होते....

गाडीच्या चाकांखालीं रक्ताचं थारोळं सांचलं होतं.

त्यानं हें सारं मुकाट्यानं पाहिलं नि हताशपणें मान हलवून एक दीर्घ निःश्वास सोडला.

...बाजूलाच पडलेली आपली थैली त्यानं उचलली नि तिच्यांतील भजी-चुऱ्याचा ओला झालेला पुडा काढून तो दूर भिरकावून दिला. मग त्यानं आपली काठी उचलली...काळोखाच्या पांघरुणाखालून डोकावणाऱ्या त्या भयंकर दृश्यांतून पुन्हां एकदां आपली असहाय नजर फिरवली नि मागं वळून न पहातां तो झपाझप घाटी उतरूं लागला.

...शिगोटीच्या शेताडींत शिरून तो मघांच्या त्या खोपटापाशीं आला. दाराशींच झोंपलेल्या त्या म्हाताऱ्याला जोराची धांप लागलेली त्याला ऐकूं आली. बेदरकारपणें तो पुढं झाला...पुढं झाला...नि अर्जुना भुसाऱ्याच्या खळ्यांतूनच तो ओरडला...सारीं कुत्रीं बेंबीच्या देंठापासून त्याच्यावर भुंकत

होतीं तरी तो ओरडला,...' अवं तुमचा ल्योक मरून पडलाहे व्हं पिंपळाच्या पीरापाशीं...'

अन् झर्रकन् तो मागें वळून चालूं लागला. तो रस्त्यावर येतो न येतो तोंच दार उघडून मघांचा तो ढेरपोट्या गृहस्थ धांवत धांवत बाहेर आला. त्याच्या पाठोपाठ घरांतलीं सगळीं माणसंहि खळ्यांत आलीं.

' कोण ?...कोण ?...अरं कोण रं बोललं आतां ? '

हूं नाहीं कीं चूं नाहीं...

आजूबाजूला घनदाट काळोख ओथंबून राहिला होता. अर्जुना भुसाऱ्याचा थोरला लेक हणमंत्या सकाळींच मलकेश्वराला गाडी घेऊन गेला होता त्याचा अद्याप पत्ता नव्हता नि त्याचीच वाट पहात अर्जुनशेट अद्याप बसले होते.

' आरं कोण रं बोललं आतां ?...आँ ?...'

हळूहळू तो आवाज त्याला ऐकूं येईनासा झाला तसा तो थांबला नि मागं वळून पचकन् चिखलांत थुंकला.

पाऊस ओसरण्याचीं कांहींच लक्षणं दिसत नव्हतीं. त्याला वाटलं, आज हा काळा काळोख या मुसळधार पावसांत वितळणार नि उद्यां याच काळोखाच्या पाण्यांत उभं जग बुडून जाणार.

तसाच तो झपाट्यासरशीं मागं वळला नि काठी टेंकीत टेंकीत त्या काळोखाच्या कुशींत शिरला.

त्याला कुणालाच कसला प्रश्न विचारायचा नव्हता...नि कुणालाच कसलं उत्तरहि द्यायचं नव्हतं !

१९५२

* * *

: ८ :

# कशाला जगायचं ?

**पहांटे** आकाश उजवायला सुरवात झाली, तेव्हां दुधाच्या साईसारखं पसरलेलं धुकं हळू हळू वितळायला लागलं. आपल्या पांढऱ्या शुभ्र फुलांचा पिसारा फुलवून शेवग्याचीं झाडं नव्या दिवसाची प्रतीक्षा करूं लागलीं. मोरपिशी रंगाच्या पाण्याबाहेर हळूच डोकीं काढून उगवत्या जगाकडे आपले पहिलेवहिले कटाक्ष फेंकणाऱ्या चलाख मासोळ्या; त्या स्तब्धावलेल्या पाण्यावर सहस्रावधि वर्तुळं कोरूं लागल्या. पूर्वेकडून शिगोशिग भरून येणाऱ्या वाऱ्याच्या लाटेंत कुठून तरी सुगंधाचे निःश्वास येऊन मिळाले अन् अंधाराची मदिरा पिऊन जोषांत आलेल्या पृथ्वीचा गोल, दोऱ्याच्या विळख्यांतून सुटलेल्या भिंगरीसारखा भिरभिरत पूर्वेकडे झेंपावला....

...पूर्वेकडे झेंपावला नि पॅरॅशूटस् अलगद खालीं उतरतात तशीं गुलाबी उन्हं झाडांच्या शेंड्यांवर सरकलीं. लांब कुठं तरी, कुठल्यातरी गिरणीचा भोंगा वाजूं लागला. इंजिनाची शीळ ऐकूं आली अन् लांबून कुठून तरी खळखळत आलेल्या वाऱ्याच्या नवथर झुळुका डॉ. देसायांच्या हॉस्पिटलमधील ओल्या बाळंतिणींच्या भोंवतीं फेर धरून नाचूं लागल्या. अजून पुरते डोळेहि न उघडलेल्या कोंवळ्या बालकांच्या अंगांना त्यांनीं स्पर्श केला. कांहींचीं अंगं थरथरलीं नि तीं झोपेंतल्या झोपेंत हंसूं लागलीं. कांहींनीं आपले मिटलेले डोळे उघडले नि आपल्याच भाषेंत तीं देवाशीं बोलूं लागलीं. कांहींनीं अगदीं घट्ट घट्ट मुठी वळल्या नि आपल्या आयुष्याचीं गुपितं त्यांत दडवून ठेवलीं.

सूर्य क्षितिजाच्या धारेवर आला. उन्हं कौलारांवरून वाहूं लागलीं, तशा बाळंतिणी जाग्या झाल्या अन् पुसट पुसट होत जाणाऱ्या अंधाराकडे पाहून आपल्या कुशींतून उतरलेल्या जिवांचा आठव करूं लागल्या. पडल्यापडल्याच त्यांनीं पायाजवळच्या पाळण्याकडे नजर लावली अन् आपल्या गर्भकोषांत नवमास राहिलेल्या त्या गोंडस फुलपांखरांकडे त्या अनिमिष नेत्रांनीं पाहूं लागल्या. कांहींना हीं फुलपांखरं मोठीं झालेलीं दिसलीं कांहींना तीं पैशाच्या पर्वताभोंवतीं पिंगा घालीत असल्याचा भास झाला. कांहींना हीं फुलपांखरं पर्वताच्या शिखरापर्यंत पोंचलेलीं दिसलीं. कांहींना तीं खालीं कोसळून जीवनाच्या धगधगत्या अंगारात भाजून, होरपळून निघाल्यासारखं वाटलं. त्यांचीं हाडं वर आलेलीं दिसत होतीं, डोळे खोल खोल गेले होते; गालाच्या खबदाडांतून त्यांच्या कर्मदारिद्र्याचा अंधार भरून राहिला होता...

गुलाबी उन्हं हळदीच्या रंगाचीं झालीं अन् ट्रॅमसच्या खडखडाटांत, यंत्रांच्या धडधडाटांत, जगाच्या कोलाहलांत जाऊन मिळालीं. दूधवाले भय्ये पिचलेल्या सायकलींवरून घिरट्या घालूं लागले. वर्तमानपत्रं विकणाऱ्या पोरांना कंठ फुटले अन् म्युनिसिपालटीचे झाडूवाले रस्त्याला चिकटून बसलेले शेणाचे खपले खरवडून काढूं लागले. पोटासाठीं मरणारीं माणसं, पोट पाठीला मारून आकसानं पळत सुटलीं...

सूर्य कासराभर वर आला. डॉ. देसाई आपल्या पोटाच्या नगाऱ्यावरून हात फिरवीत फिरवीत आंत आले नि वॉर्डांतून एक चक्कर टाकून गेले. कांहीं बाळंतिणींनीं पोलक्याचीं बटनं सोडलीं नि दुधाच्या कलशांना वासरांचीं तोंडं लावलीं. कांहीं बाळंतिणी आपापल्या अर्भकांच्या नाकाडोळ्यांची पारख करूं लागल्या. कांहीं स्वतःचीच वेणीफणी करायला बसल्या. कांहीं चोरट्या नजरेनं एकमेकींकडे पाहून कपाळाला आंठ्या घालून बसल्या.

हेड नर्स लाडावलेल्या नवरीसारख्या लचकत लचकत आंत आल्या नि आपले दोन्ही हात पांढऱ्या स्वच्छ ॲप्रनच्या खिशांत खुपशीत एका खाटेजवळ येऊन उभ्या राहिल्या. ह्या खाटेवरची बाळंतीण आपल्या मुलाला कपडे चढवीत होती. अन् हें सारं करतां करतां कुणाची तरी वाटहि पहात होती. हेड नर्स रुक्मिणीबाईनीं ॲप्रनच्या खिशांत घातलेले दोन्ही हात

उगीचच्च हालवले नि त्या बाळंतिणीकडे पाहून त्या म्हणाल्या, ‘ उर्मिलाबाई, आतां परत कधीं येणार ? ’ त्याबरोबर आजूबाजूच्या दोनचार बाळंतिणी फिदीफिदी हंसल्या. एकदोघींनीं रुक्मिणीबाईंच्या या विनोदावर कांहीं भाष्यंहि करण्याचा प्रयत्न केला. अगदींच नाईलाज झाल्याप्रमाणें ती बाळंतीणही गालांतल्या गालांत हंसली नि मुकाट्यानं आपलं काम करूं लागली.

डॉ. देसायांच्या हॉस्पिटमधला आज तिचा अकरावा दिवस होता. आज ती इथल्या औषधाच्या वासाला सोडून, मुलांच्या किरकिरीपासून दूर दूर आपल्या घरीं जाणार होती. तरीहि तिचा चेहरा आजच्या इतका उदास कधींच दिसला नव्हता. एकाच्च खोलींत बरींच वर्षं राहिल्यानंतर ती खोली सोडून जातांना जसं चुकल्याचुकल्यासारखं वाटतं तसं तिला वाटत होतं. इथलं सारं वातावरण तिला पसंत होतं असं नव्हे, पण आज ती जिथं परतणार होती तिथलं वातावरण इथल्यापेक्षां खात्रीनं भयंकर असलं पाहिजे. गेले दहा दिवस खाटेवर पडल्यापडल्या आपल्या संसाराचीं कितीतरी बरींवाईट चित्रं तिनं नजरेसमोर रेखाटलीं होतीं. आपल्या सुखाच्या कल्पना शक्य तितक्या ताणून आपली अधिकाधिक जगण्याची आकांक्षा तिनं वाढीस लावली होती. पण आज सकाळीं पूर्वेकडून वहात आलेल्या त्या वाऱ्याच्या झुळुकेनं तिला जागी केली तेव्हांपासून ती अगदीं गांगरल्यासारखी झाली होती. अंधाराच्या समुद्रांत बुडून राहिलेला, दहा बाय बाराच्या दोन खोल्यांत सामावलेला तिचा फाटका संसार एकसारखा... एकसारखा तिच्या डोळ्यांपुढं येत होता. एकाएकीं आपलं हृदय जड जड होत चाललं आहे असं तिला वाटूं लागलं. ओठ अगदीं घट्ट दाबून धरून या साऱ्या भावना आंतल्या आंत दडपण्याची तिनं शिकस्त केली. पण तरीही तिचे डोळे पाणावले आहेत हें हेड नर्स रुक्मिणीबाईंच्या लक्षांत आल्यावांचून राहिलं नव्हतं. उगीच्च कांहीं तरी बोलायचं म्हणून त्या म्हणाल्या,

‘ उर्मिलाबाई, तुमच्या हाताचीं नखं किती वाढलीं आहेत हो हीं ! ’ अन् उर्मिलाबाईंनीं आपल्या नखांकडे दृष्टिक्षेप करण्याआधींच त्यांनीं गणूला हांक मारून डॉक्टरांच्या टेबलाच्या उजवीकडच्या खणांतली कातर आणण्यास सांगितली. झटकन् उर्मिलाबाईंनीं त्यांच्या हातांतून आपले हात सोडवून घेतले नि त्या म्हणाल्या, ‘ आतां जायच्या वेळेला नका काढूं. मी काढीन घरीं ’ अन्

पुन्हां त्या कामाला लागल्या. मग रुक्मिणीबाईहि यावर कांहीं बोलल्या नाहींत. गणूनं आणून दिलेली कातर त्यांनीं ॲप्रनच्या एका खिशांत टाकली नि उर्मिलाबाईच्या मांडीवर हुंदडणाऱ्या छोकऱ्याचा त्यांनीं गालगुच्चा घेतला. त्याच्याकडे पाहून जीभ काढली. डोळे मोठे केले नि त्याच्या दोन्ही हातांच्या मुठी आपल्या ओंजळींत धरून ठेवल्या.

'हं, मग घरीं गेल्यावर तरी काढा बरं का ! नाहींतर मला यावं लागेल!' उर्मिलाबाई नुसत्या हंसल्या.

'पण कां हो उर्मिलाबाई, कालपरवां तुमच्याकडून कुणीच कसं आलं नाहीं ? निदान तुमचे यजमान तरी— '

'कुणास ठाऊक...कांहींतरी कामग्रीम निघालं असेल. शिवाय काम थोडसं लहरीच आहे ! '

'पण आज तरी येतों म्हणून सांगितलंय् का ? '

'माझ्याजवळ कांहीं म्हणाले नाहींत. पण या गोष्टींत एवढं सांगायचं तरी काय असतं ? येतील यायचं असलं तर थोड्या वेळांत. '

इतक्यांत हॉस्पिटलच्या आवारांत कुणाची तरी मोटार येऊन उभी राहिल्याचा आवाज आला. रुक्मिणीबाई म्हणाल्या, 'व्हॉट ए फनी थिंग ! आत्तां आपण त्यांच्याविषयीं बोलत होतों. एखाद्या आजीबाईच्या भाषेंत सांगायचं म्हणजे अगदीं शंभर वर्षं आयुष्य आहे तुमच्या यांना, उर्मिलाबाई. '

इतक्यांत सतरा अठरा वर्षांचा एक मुलगा तिथं आला नि म्हणाला, 'वहिनी, चलायचं ना ? टॅक्सी आणली आहे. '

त्याच्याकडे बराच वेळ पहात राहिल्यानंतर उर्मिलाबाईनीं विचारलं, 'हे नाहीं आले ? '

त्या मुलानं हा प्रश्न ऐकल्या न ऐकल्यासारखं केलं नि त्यांच्या मांडीवरील छोकऱ्याकडे पहात तो तसाच उभा राहिला. मध्येंच रुक्मिणीबाईनीं विचारलं, 'हे तुमचे भावोजी वाटतं ? '

उर्मिलाबाईनीं नुसतं 'हूं ' केलं नि मुलाकडे पहात पहात त्या विचार करूं लागल्या.

'कां नाहीं आले ?' पदर सारखा करतां करतां उर्मिलाबाईनीं विचारलं.

'अं...?' त्यानं पुन्हां लक्ष नसल्याचं सोंग केलं.

'कां आले नाहींत ?' उर्मिलाबाईनीं पुन्हां विचारलं.

'अगदीं थेट अण्णांसारखाच दिसतो आहे, नाहीं ?'

'हो, पण ते कां आले नाहींत हें नाहीं सांगितलंस.'

'आतां मला तरी काय माहीत ? भाऊंनीं मला सांगितलं, हे पैसे घे नि टॅक्सी करून वहिनीला घेऊन ये...' अन् एकदम तो गप्प झाला.

उर्मिलाबाईनीं एक निःश्वास सोडला. कुणाशींच कांहीं न बोलतां आजूबाजूच्या बाळंतिणींचा निरोप घेतला नि आपल्या कुशींतून उतरलेलं तें फुलपांखरूं अलगद उचलून घेऊन त्या निघाल्या.

'रुक्मिणीबाई, जात्यें. ओळख ठेवा.'

'वहाव्वा ! म्हणजे हा चांगला न्याय आहे. इथं या, दहा दिवस रहा नि जातांना आम्हांलाच सांगा ओळख ठेवा म्हणून ! इथं येतांना आपल्या यजमानांनाहि असंच सांगितलं होतं कीं काय ?'

उर्मिलाबाईनीं उगीचच हंसल्या हंसल्यासारखं दाखविलं नि त्या वॉर्डांतून बाहेर पडल्या. डॉक्टरांचा निरोप घेण्यासाठीं त्या डावीकडच्या दिवाणखान्यांत आल्या नि त्यांच्यासमोर जाऊन नुसत्या उभ्या राहिल्या. त्या आल्या तेव्हां डॉक्टर कांहींतरी लिहीत होते. वर न पहातांच त्यांनीं मोठ्यानं हेल काढून विचारलं, 'यस् ?'

'डॉक्टर, मी जात्यें.'

'अं...? कोण ?...ओहो. तुम्ही...तुम्ही जातां ? अच्छा. म्हणजे आजचा तुमचा अकरावा दिवस तर ? —ऑल राईट—नमस्ते' अन् ते पुनः लिहूं लागले.

उर्मिलाबाई निघाल्या. मध्येंच त्यांना एका मोलकरणीनं विचारलं, 'चालल्यांव ?' तेव्हां त्यांनीं नुसती मान हलवून 'हूं' म्हटलं अन् मघाशीं आलेल्या त्या मुलाकडून आठ आणे घेऊन तिच्या हातावर ठेवले. पैसे हातांत पडतांच मोलकरणीनं उर्मिलाबाईच्या हातांतील मुलाच्या गालावर अलगद चापट

मारली अन् आपले काळे पिवळे, तांबडे दांत काढून त्याला माणसं कशीं हंसतात हें दाखविलं.

जड जड अंतःकरणानं उर्मिलाबाई टॅक्सींत येऊन बसल्या. त्यांच्या पाठोपाठ तो मुलगाहि बसला. उर्मिलाबाई कसलातरी, कसलातरी विचार करीत होत्या. कांहींतरी कुठंतरी चुकल्याचुकल्यासारखं त्यांना वाटत होतं. तो मुलगाहि टॅक्सी चालली होती तिच्या पुढें येणाऱ्या रस्त्याकडे नुसताच पहात राहिला होता. अधूनमधून तो आपल्याकडे अन् आपल्या हातांतल्या अर्भकाकडे चोरून पहात असल्याची जाणीव उर्मिलाबाईंना होत होती.

सूर्य एव्हांना बराच वर आला होता. आकाश तापायला सुरवात झाली होती. सूटबूटवाले लोक खटाक् खटाक् करीत ऑफिसला निघाले होते. एकदोघे रिकामटेकडे लोक भर रस्त्यांत सायकल शिकत होते. दोनचार पोरं त्या सकाळच्या वेळींसुद्धां एका आईस्‌फ्रूटच्या गाडीकडे आशाळभूतपणानं पहात राहिलीं होतीं.

उर्मिलाबाईंनीं विचारलं, ‘ भाऊ आले आहेत ? ’

तो मुलगा म्हणाला, ‘ हं ’.

‘ कधीं ? ’

‘ काल संध्याकाळीं... ’

‘ कशाला ? ’

त्या मुलानं खालचा ओंठ बाहेर काढला नि मान उजवीकडे कलवून म्हटलं, ‘ मला काय माहिती ? ’

उर्मिलाबाईंनीं पुन्हां एक निःश्वास सोडला अन् टॅक्सीवाल्यानं हातांत धरलेल्या स्टीअरिंग व्हीलकडे त्या विषण्ण नजरेनं पाहूं लागल्या..

‘ आणखी कोण कोण आलं आहे ? ’

‘ कुणी नाहीं. फक्त रमावहिनी तेवढी आहे त्यांच्याबरोबर. ’

‘ हे दोन दिवस हॉस्पिटलांत कां आले नाहींत ? ’

त्या मुलानं पुन्हां खालचा ओंठ बाहेर काढला नि टॅक्सीखालून सरपटत जाणाऱ्या रस्त्याकडे तो पहात राहिला.

टॅक्सी वळणावर आली तेव्हां रस्त्याच्या कडेला सिगारेटी फुंकत राहिलेल्या एका टोळक्यांतील कुणीतरी म्हणाला, 'ए, रामची वहिनी आली.'

उर्मिलाबाईच्या तें कानावर आलं, पण त्या कांहींच बोलल्या नाहींत.

थोड्या वेळानं ड्रायव्हरला हात दाखवून गाडी कुठं उभी करायची तें सांगितलं नि तो उर्मिलाबाईकडे पाहूं लागला.

'वहिनी, आलं...'

गाडी थांबली. तो मुलगा बाहेर आला. त्यानं सभोंवार नजर फेंकली. प्रत्येक खिडकींतून, दारांतून, गॅलरींतून हजारों, लाखों डोकीं, गारुड्याचा खेळ पहायला जमतात तशीं जमलेलीं त्यानं पाहिलीं. लगोऱ्या खेळणारीं पोरं एकदम थांबलीं नि त्यांनीं त्या गाडीभोंवतीं गराडा घातला. कांहीं तिचा मीटर तपासूं लागलीं. कांहींनीं त्या गाडीच्या मॉडेलसंबंधीं आपआपसांत पैजा मारल्या. त्यांतल्याच कुठल्या तरी एका पोराच्या आईनं त्याला मोठ्यानं हांक मारली, तेव्हां आपल्या किनऱ्या आवाजांत तो गरजला, 'येत नाहीं जाऽऽऽ.' कांहीं शिष्ट लोकांनीं सहज म्हणून गॅलरींत उभं रहाण्याचं सोंग केलं नि पुष्कळशा मूर्ख, बेअकली बायका बेधडक आपल्या घरांतून त्या टॅक्सीकडे बघत आपापसांत कुजबुजूं लागल्या.

त्या मुलानं ड्रायव्हरच्या हातावर पैसे ठेवलं नि तो उर्मिलाबाईना म्हणाला, 'वहिनी, उतरा.'

उर्मिलाबाई हातांतल्या ओझ्यानिशीं उतरल्या नि आजूबाजूला अगदीं सहज त्यांनीं नजर फिरविली. कां कुणास ठाऊक, पण आपल्या भंवतालीं आजूबाजूच्या चाळींतून डोकावणारीं हीं माणसं आपल्याकडे एका चमत्कारिक नजरेनं पहात आहेत असं त्यांना वाटलं. त्यांच्या छातींत एकदम धस्स् झालं. पाठीमागं टॅक्सीवाल्यानं मीटर पाडला, त्याची छोटीशी घंटा किणकिणली. मागचं दार त्यानं धाडकन् लावून घेतलं नि टॅक्सी सुरू केली. तिचा घुर्र...घर्र असा आवाज आला तोहि उर्मिलाबाईना चमत्कारिक वाटला.

दुसऱ्या मजल्यावरील आपल्या खोलींत पाऊल टाकीपर्यंत उर्मिलाबाईना पंचवीस तीस हजारांच्या गर्दीतून चालत आल्यासारखं वाटलं. कुठंतरी कांहींतरी दगाफटका आहे अशी कल्पना त्यांच्या मनाला चाटून गेली. कारण नसतांना

' तुमचे यजमान कालपरवां कां आले नाहींत ? ' हा रुक्मिणीबाईचा प्रश्न त्यांना पुन्हां आठवला. कसल्यातरी भीतीनं त्यांनीं हातांतला गुंसाचा गोळा आपल्या छातीशीं घट्ट दाबून धरला नि बावरलेल्या अंतःकरणानं त्यांनीं जिन्याच्या पायऱ्या चढायला सुरवात केली ! एक...दोन...तीन...चार...पांच...एक... दोन...तीन...

भाऊ दारांतच उभे होते. उर्मिलाबाईना पहातांच ते म्हणाले, ' आलीस ? ये. '

तेवढ्यांतच रमावहिनी आंतून आल्या नि त्या उर्मिलाबाईकडे पाहूं लागल्या. त्यांच्या हातांतलं तें ओझं त्यांनीं आपल्याकडे घेतलं नि त्याच्याकडे क्षणभर पाहिल्यासारखं करून त्या उर्मिलाबाईना स्वयंपाकघरांत घेऊन गेल्या.

' शू ऽऽऽ हे कुठं गेले ? '

रमावहिनी कांहींच बोलल्या नाहींत.

' कालपरवां हॉस्पिटलांत कां आले नाहींत ? '

तरीहि रमावहिनी कांहींच बोलल्या नाहींत.

' तुम्हीं कधीं आलां ? '

' काल संध्याकाळीं. '

' हों, राम सांगत होता. '

थोडा वेळ कुणीच कांहीं बोललं नाहीं.

' कुठं गेले आहेत, कुठं ? '

' सांगतें, पण धीरानं ऐकणार असाल तर...'

' अं...? '

' धीरानं ऐकणार असाल तर...'

उर्मिलाबाईनीं डोळे तारवटले नि रमावहिनींचे दोन्ही खांदे धरून त्यांना गदगदां हलवीत म्हटलं, ' बाळाची शपथ आहे तुम्हांला. सांगा...सांगा न् ! कुठं गेले आहेत ? '

रमावहिनी उठल्या नि बाहेरच्या खोलींत आल्या. हातांतलं तें नाजूक ओझं त्यांनीं भाऊंच्या हातांत दिलं नि त्या पुन्हां आंत आल्या.

' वहिनी, प्रकाशभावोजी वारले. '

उर्मिलाबाई गरगर डोळे फिरवूं लागल्या. उजव्या हाताचीं दोन बोटं त्यांनीं दांतांत धरलीं नि त्या किंचाळल्या.

' वहिनी, तुम्हीं धीरानं ऐकण्याचं वचन दिलं आहे. तुम्हांलाहि बाळाची शपथ आहे. '

उर्मिलाबाई धाड्‌कन् जमिनीवर कोसळल्या. पण पुन्हां उठल्या. त्यांनीं रमावहिनींच्या नजरेला नजर लावली नि म्हटलं, ' सांगा...'

' भावोजी परवां सकाळीं आगगाडीखालीं सांपडले...'

' मग मला कां कळवलं नाहींत ? कां कळवलं नाहींत ? '

' कळवण्यासारखं त्यांत कांहींच नव्हतं. पण मग सांगेन कधींतरी...'

' नाहीं... नाहीं... नाहीं ! आत्तांच सांगून टाका–मी धीरानं ऐकतें आहे—'

' त्यांचं शरीर—'

' बोला, बोला, कचरूं नका. मी धीरानं ऐकतें आहे. बाळाची शपथ ! '

' त्यांचं, शरीर...पहाण्याच्या अवस्थेंत उरलं नव्हतं ! '

उर्मिलाबाईंच्या नजरेसमोर कितीतरी भयाण चित्रं थैमान घालूं लागलीं. रुक्मिणीबाईंच्या त्या प्रश्नाला त्यांना उत्तर मिळालं. घरीं येतांना ' ए, रामची वहिनी आली ' या कानावर पडलेल्या वाक्याचा अर्थ लागला अन् टॅक्सींतून उतरतांना आपल्याकडे लागलेल्या लोकांच्या नजरा इतक्या चमत्कारिक कां होत्या हेंहि कोडं त्यांना सुटल्यासारखं वाटलं.

त्यांच्या डोळ्यासमोरचा अंधाराचा समुद्र जास्त काळा होत चालला. त्यांत रंगीबेरंगी काजवे पिसाळलेल्या भुताटकीसारखे सैरावैरा पळूं लागले...

अन् त्यांची शुद्ध गेली...

बऱ्याच वेळानं त्यांनीं डोळे उघडले, तेव्हां आपल्याच खोलींतील स्वयंपाकघराची ओळख पटायला त्यांना कितीतरी वेळ लागला. पण ओळख पटतांच त्या उठून बसल्या. आजूबाजूला पडलेले दोनचार ठेचलेले कांदे त्यांनीं आवेगाच्या भरांत समोरच्या भिंतीवर भिरकावले. झर्रकन् कपाळावरचं कुंकू पुसून टाकलं. हातांतल्या बांगड्या चेंचून, फोडून, झुगारून दिल्या अन् पुन्हां त्यांची शुद्ध गेली...

त्या शुद्धीवर आल्या तेव्हां त्यांच्या मनांतलं वादळ बरंचसं ओसरलं होतं. मुकाट्यानं त्या उठल्या. रमावहिनींनीं उपसून ठेवलेल्या पाण्यानं त्यांनीं आंघोळ करून घेतली नि जेवणाखाण्याची पर्वा न करतां त्या पुन्हां मधांच्याच कोपऱ्यांत जाऊन बसल्या.

या साऱ्या गोंधळांत त्यांना, आपल्या वाढलेल्या नखांची आठवण झाली. नखांवरून त्या रुक्मिणीबाईंचा विचार करूं लागल्या. रुक्मिणीबाईंवरून त्यांना हॉस्पिटलची आठवण झाली. हॉस्पिटलवरून त्यांना आपलं बाळ आठवलं. अन्...अन्... बाळावरून आगगाडीखालीं सांपडून मेलेल्या आपल्या पतीची त्यांना आठवण झाली. पुन्हां वादळी ढग दबा धरून बसले. समुद्राच्या तळाचं पाणी गढूळ होऊन वर आलं नि आकाशालाहि भुरका रंग चढला.

गेल्या वर्षभरांतला, लग्नानंतरचा सारा इतिहास त्यांनीं घाईघाईनं उलटून पाहिला. आपली आर्थिक स्थिति किती पोंखरून निघाली आहे याची पुरेपूर कल्पना येण्यास त्यांना वेळ लागला नाहीं. प्रकाशबरोबरच्या आपल्या आंतर-जातीय विवाहाला दोन्ही बाजूंकडील लोकांनीं केलेला विरोध पुन्हां जिवंत होऊन उठला. याच भाऊंनीं, याच रमावहिनींनीं आपल्या घराची पायरीहि न चढण्याची घेतलेली शपथ त्यांना स्मरली अन् त्यांच्या अंगाची लाही लाही होऊं लागली. भविष्याची कोरी करकरीत पार्श्वभूमि त्यांच्या नजरेसमोर उभी राहिली नि त्या अनंत पोकळींत कुणीतरी ‘ पुढं काय ? ’ असं ओरडलं तेंहि त्यांना ऐकूं आलं. त्यांनीं कांहीं तरी निर्णय घेतला नि त्या स्वस्थ पडून राहिल्या. त्यांची नजर एकदम पालटलेली दिसली. सहस्रावधि वादळांचे संघर्ष त्यांच्या डोळ्यांच्या कडांकडांतून ओसंडूं लागले.

दुपारीं रमावहिनींनीं त्यांना थोडंसं जेवून घ्यायला सांगितलं पण त्या तशाच स्वयंपाकघरांतल्या कोंपऱ्यांत पडून राहिल्या.

थोड्या वेळानं बाळ उठला, तेव्हां त्यांनीं त्याला आणायला सांगितलं. त्याला त्यांच्या स्वाधीन करून रमावहिनी बाहेरच्या खोलींत आल्या. उर्मिला-बाइनीं बाळाचं इवलंसं तोंड आपल्या स्तनाला लावलं, तेव्हां कोटि कोटि सूर्यांच्या उष्णतेहून प्रखर अशा धगीची एक प्रचंड ज्वाला त्यांच्या

दुधांतून बाहेर पडते आहे असा भास त्यांना झाला. त्यांनीं बाहेरच्या खोलींतली चाहूल घेतली... मन घट्ट घट्ट केलं. ... अन् बाळाच्या अंगावरून फिरणारा हात त्याच्या मानेजवळ आणला...त्यांच्या साऱ्या अंगाला घाम सुटला होता. त्यांचे डोळे तारवटले होते. क्रूर, भयाण, अमानुष दिसूं लागले होते...त्यांनीं पुन्हां बाळाच्या गळ्याजवळ हात नेला. त्यांना वाटलं...पुष्कळ दाबलं तर ताडगोळ्यासारखं बोट आंत जाईल...त्यांनीं अदमास घेतला. पुन्हां त्या लुसलुशींत गळ्यावरून हात फिरवला. एकदांच...एकदांच तो मांसाचा गोळा अगदीं आपुलकीनं उराशीं घट्ट कवटाळला अन् अखेरचा निर्णय घेऊन त्यांनीं बाहेरच्या खोलीची चाहूल घेतली...कशाला यापुढें जगायचं ?...अन् कशाला जगवायचं ?

इतक्यांत...इतक्यांत...बाहेरच्या दाराची कडी वाजली नि कुणीतरी अगदीं हळुवार आवाजांत विचारलं, ' उर्मिलाबाई आहेत का ? '

उर्मिलाबाईंना तो आवाज ओळखीचा वाटला. त्या एकदम दचकल्या. त्यांचं अंग थरथरूं लागलं...कान देऊन त्या ऐकूं लागल्या...बाहेरच्या खोलींत रमावहिनींशीं ती आतां आलेली व्यक्ति कुजबुजत होती—

' मला डॉक्टरनीं सारं सांगितलं आहे. पण एक घोंटाळा झाला आहे...'

' घोंटाळा ? '

' हं...उर्मिलाबाईंनीं सकाळीं आणलेलं मूल बदलून आलं आहे. '

' अं–? म्हणजे ?...'

' म्हणजे त्यांनीं सकाळीं आपल्याबरोबर जें मूल आणलं आहे तें दुसऱ्याचं आहे. '

' हें तुम्हांला कसं कळलं ? '

' आमच्या हॉस्पिटलांत फक्त उर्मिलाबाईंच्याच मुलाच्या पोटावर तुळशीचं पान होतं. सकाळीं उर्मिलाबाई घरीं निघाल्या तेव्हां ज्या बाईचं मूल त्यांनीं आणलं आहे तिच्या मुलाला मी आंघोळ घालायला बसलें. तेव्हां त्याच्याहि पोटावर मला तुळशीचं पान दिसलं. मी अधिक चौकशी केली तेव्हां तें मूल उर्मिलबाईंचंच असल्याची माझी खात्री झाली... '

उर्मिलाबाईंना वाटलं, पुन्हां आपली शुद्ध जाते आहे. त्यांनीं त्या मुलाच्या गळ्यावरचा हात झटकन् मागं घेतला नि थरथरत्या हातांनीं तो मांसाचा गोळा आपल्या छातीशीं अगदीं घट्ट घट्ट बिलगून धरला.

त्या शुद्धीवर आल्या तेव्हां रुक्मिणीबाई तिथं नव्हत्या. रमाबाई कुणालातरी म्हणत होत्या, 'प्रकाशभावजींच्याही पोटावर होतं तुळशीचं पान. हें पहा अगदीं अस्संच, अस्संच.' अन् आपल्या हातांतल्या मुलाच्या पोटावर असलेल्या एका पुसट डागाकडे त्या पहात होत्या.

उर्मिलाबाईंनीं डोळे उघडले नि उठतां उठतां त्या किंचाळल्या.

' रमावहिनी...रमावहिनी, त्याला इथं आणा. तो भुकेला झाला आहे. त्याला इथं आणा. मला त्याला पाजायचं आहे.'

पुन्हां उर्मिलाबाईंची शुद्ध गेली नि त्या बडबडूं लागल्या, 'रुक्मिणीबाई, माझीं नखं काढून टाका. तुम्हां लोकांना अकला आहेत कीं नाहींत?'

१९५१

* * *

: ९ :

# माझा बाप नटवर्य होतो

नवरात्र हा आमचा हैदोस घालायचा हंगाम. या हैदोसांत आमचाच गांव नव्हे, तर त्याच्या पंचक्रोशींतील सगळीं गांवंही, जणूं हा आपल्या कर्तव्याचाच एक भाग आहे अशा अहमहमिकेनं भाग घ्यायचीं—अजूनही घेतात. मिरगाच्या धुंदट सरी पिऊन टरारलेलीं अन् काळ्या मातीच्या गालिच्यावर उभीं राहून, डोचकीं वर काढून चांदण्या मोजणारीं हिरवींगार पिकं दुधाळूं लागे–लागेस्तंवर भादवा अर्धा अधिक उडायचा. तोंपर्यंत गौरी–गणपति वडे–मोदक खाऊन जायचे. गौरी नटल्याथटल्याचं निमित्त साधून आम्हींही इकडचीं तिकडचीं दोनचार कोंबडीं होलपटून आणायचे नि पोटं तुडुंब भरेपर्यंत मटन नि वडे...मटन नि वडे–दिवसभर ओरपत बसायचे. या दिवसांत दारू प्यायला बाबा राजरोस मोकळा व्हायचा. देवीसाठीं हें सारं करावं लागतं म्हणून बेटा तोंड वर करून हांकाटी करायचा. वेताळगढीच्या शिखरावरचं लक्ष्मीचं पडकं देऊळ एरव्ही वरीसभर ओस असायचं. पाकोळ्या, वटवाघळं, रानपारवे यांना त्यांतल्या त्यांत ऐसपैस जागा मिळायची. पुजारीबाबाही आठवड्यांतून एकदां वात लावायला त्या बाजूनं फिरकला म्हणजे पुष्कळ झालं. अन् पाठीचा कणा मोडून गढीचा कंगोरा चढून जायची यातायात तो बामण तरी कशाला करतो ? त्याला त्या देवळांत तांदूळ मिळायचे होते, कीं नारळ सांपडाचे होते, कीं कुणी कनवटीचा पैसा दक्षणा म्हणून देणार होतं ? नवरात्रीचे नगारे झडायला लागले म्हणजे मात्र लेकाचा फुटाण्यासारखा उडायला लागायचा. मग

वेताळगढीच्या लक्ष्मीदेवीचा पुजारीपणा हें आपलं वंशपरंपरागत वतन आहे याची त्याला आठवण व्हायची. गांवांत मर्तिक झालं, श्राद्ध असलं, शिधा द्यायचा असला तरी भटजींबुवांना वेळ नसायचा. देवीच्या दगडी मूर्तीवर सांचलेला तेलाचा कीट काढण्यांत येऊन त्यावर घांसूनपुसून चकचकीत केलेला पितळेचा मुखवटा चढायचा. हिरव्या गंजानं कळकटलेल्या अन् आवाजी बसलेल्या घंटांना चिंच–लिंबू लागायचं. भाड्यानं आणलेलीं झुंबरं तक्तपोशीला लटकूं लागायचीं. तांदळाची पेटी धुवून पुसून स्वच्छ व्हायची. देवळाच्या आवारांत मांडव उभा रहायचा. कुत्र्याच्या छत्र्या उगवतात तशी जत्रेंत दुकानंच्या दुकानं उठायचीं. पेढे, बर्फी, बत्तासे, फुटाणे, बुक्का, पिंजर, मुरमुरे, डाळ, चिवडाभजीं यांच्या परातीच्या पराती लालभडक रंगाच्या कापडावर ठाण मांडून बसायच्या. पाळणे गरगरूं लागायचे. लांकडी घोड्यांनीं रिंगण धरायचं. सोडालिंबूच्या बाटल्या फसफसूं लागायच्या. उसाच्या रसाचीं गुऱ्हाळं कुरकुर करायचीं. कुस्त्यांच्या फडांत तांबडमाती येऊन पडायची. जिथं दिवसासुद्धां रातकिड्यांची किरकिर कानीं यायची तिथं नऊदहा दिवस लोकांची अशी झुम्मड व्हायची कीं रात्रींचा रात्रपणा क्षणभर नाहींसा झाल्यासारखा वाटायचा. जसजशी रात्र चढत जाई तसतसा माणसांच्या रंगेलपणाला ऊत यायचा. मुद्दाम सुट्या करून आणलेल्या चवल्या पावल्या मनगटाच्या गुबगुबीत मांसावर गुपचुप येऊन बसत, त्या तायडी बाणकोटकरीण, विठी कंबळकरीण किंवा कमळी विसापूरकरीण यांच्या लुसलुशीत ओंठांचा गुलाबी स्पर्श झाल्याखेरीज जागच्या हलायलाच कबूल नसत. पण सगळ्यांत गंमत येई ती नऊही रात्रीं निरनिराळ्या गांवांतील लोकांनीं केलेलीं नाटकं पहातांना. कीर्तनाला होई त्याच्या पांचपट गर्दी नाटकांना होई. जिथून जिथून म्हणून स्टेजवरच्या लोकांचीं थोबाडं दिसणं शक्य होतं तिथं तिथं माणूस चिकटून बसे. पिंपळाच्या, वडाच्या, लिंबाच्या अगर चिंचेच्या झाडाच्या ' बालकन्या ' होत......

रोज नवीन नवीन नाटकं. शिवाजीवरचीं, संभाजीवरचीं, नारायणराव पेशव्याच्या खुनावरचीं, कौरवपांडवांवरचीं, दारूबंदीवरचीं...कालच्यापेक्षां आजचं नाटक झक्क झालं, आजच्यापेक्षां परवांचं नाटक फक्कड बसलं होतं.

च्यायला म्हांबऱ्याचा गोविंदा सरमळकर एवढा सुरेख गात असेल अशी आपल्याला कल्पनाच नव्हती बुवा...कांहींही म्हण, पण परवां नानू डोंगऱ्यानं 'जरीपटक्याच्या कांठीसाठीं' च्यावेळीं पायपेटी काय तयारीनं वाजवलीय पण...वाऽवा...अर हट्...मुंबईवालं झालं म्हून काय यापेक्षां मिष्ठास गायल त्येची पेटी!...रोज मध्यान्ह व्हायची तेव्हां या नाटकांची नांदी वाजायची, तों थेट तांबडं फुटेपर्यंत नाटक चालायचं. नाटक सुरू व्हायच्या वेळेला पेंगू लागलेले डोळे हळूहळू झोंपेला विसरून जायचे. बसून बसून पाठीचा कणा खिळखिळा व्हायचा, पण त्याची पत्रास करण्याइतपत भान रहायचं नाहीं. विजयादशमीच्या आदल्या रात्रीं या उत्सवांतलं शेवटचं नाटक संपलं कीं जत्रा गुंडाळूं लागायची. नऊ रात्रीं धांगडधिंगा घालायला सवकलेल्या गांवकऱ्यांना ओकंओकं वाटूं लागायचं. घरांतलं एकादं माणूस गचकल्यासारखं भगभगीत वाटायचं.

हा हैदोसाचा हंगाम आला कीं, माझी नि बाबाची पोळी पिकायची. हें ना तें कारण काढून दिवसभर घराबाहेर वणवण करायला आम्हांला मोकळं रान होई. रात्र तर आमचीच होती. वरीसभर आयेची कटकट मुकाट्यानं सहन करणारे आम्हीं या नऊ दिवसांत तिची सारी हुशारी खुंटाळ्याला टांगून ठेवीत असूं.

अन् तशांत या वर्षीं बाबा दसऱ्याच्या आदल्या दिवशीं होणाऱ्या नाटकांत दुःशासनाचं काम करणार होता. पहिल्यांदा आपल्याला भीमाचं काम मिळालं तरच आपण नाटकांत काम करूं वगैरे बरंच अकांडतांडव त्यानं केलं होतं. पण अखेर तूं भीमाचं काम केलंस तर तुझ्या हातापायाला चिंध्या बांधून तुला लठ्ठ करावं लागेल नि तितक्या चिंध्या आसपासच्या पांच–सह गांवांतही मिळतील कीं नाहीं कोण जाणे! वगैरे किती त्याची समजूत घालावी लागली, तेव्हां कुठं त्यानं दुःशासनाचं काम करायचं कबूल केलं. त्या रागानं बाबानं दोनचार दिवस जोर बैठका काढल्या. त्याच्याबरोबर मलाही बळजबरीनं मेहनत करावी लागली. बाबा मला म्हणाला, 'पोरा, अशी मेहनत कर कीं फुढच्या वर्साला शिंचे दारासीं लोटांगण घालीत आले पायजेत तूं भीमाचा पार्ट कर म्हून. लेकांनो, गेल्या वर्साला उदेभानू केलात मला! त्येच्या मागल्या

वर्साला कुंभकर्ण बनवलात. त्येच्या आदल्या वर्सी नुसतं शिपायी गड्याचंच काम माझ्या माथीं मारलंत. पण लेको, मी तुमचं बारसं जेऊन बसलोंयं. असा न्हाइ मी बघायचा. चोरांनो, नाटकांतला भीम काय अगदीं खऱ्या भीमासारखाच दिसायाला हवा व्हंयं? थोडा इडकुळा असला तर यांच्या आईबापाचं काय जातं?' ...तीन दिवस मीं देखील कुंथत कुंथत मेहनत केली. पण मग मांड्या ठणकायला लागल्या तशी मी बाबाला म्हटलं, 'बाबा, आपल्याच्यानं नाय बा झेपणार ही मेहनत; तूं आपला हो पेलवान तुला व्हायचं असलं तर. अरं, फुडच्या वर्साचं फुडच्या वर्साला. आन् तूं जोरबैठका काढून जाडजूड व्हावास नि त्यांनीं फुडच्या वर्साला रामाचं नाटक करावं. म्हंजे आली का पुना आफत? मग झक्कत तुला धातोंडी रावणाचाच पार्ट करावा लागल. काय?'

अन् काय आश्चर्य! आयुष्यांत पहिल्यांदा माझ्या बापाला आपल्या पोराचा उपदेश पटला. पांचव्या दिवशीं आम्हीं मेहनतीच्या वाटेला गेलों नाहीं.

मग बाबा नि मी रात्रीं तालमीला जाऊं लागलों. रात्रीं पाटलाच्या घरापुढच्या अंगणांत तालीम करायची. दिवसा बाबा मला घेऊन नदीच्या वाळवंटावर जायचा नि आदल्या रात्रीं शिकलेलं वाक्य न् वाक्य हातवारे करीत कोकलायचा.

'...हां पोरा, धूर्तराष्ट्राचं भासण—शाबास...आतां मीं माझं बोलतों... आतां तुझी पाळी...बोल, किरीष्णदेवाचं बोलणं...बास्स् बास्स्...आतां माझं...'

माझ्या मनाला येईल तें मी बोलायचों नि त्याच्या मनाला येईल तें तो कोकलायचा.

एक दिवस आम्ही आयेची नजर चुकवून हांथरुणावरची चादर लंपास केली नि वळसण्याच्या बेचक्याजवळच्या रानांत वस्त्रहरणाचा शीन केला. बाबानं ती चादर माझ्या अंगाभोंवतीं लपेटली नि अंगांत आल्यासारखं करून तो फिदीफिदी हंसला. म्हणाला, 'बेंबट्या, पोरा, तूं द्रवपदी बरं का— आन् मी मी दुशासन—तूं धूर्तराष्ट्राच्या दरबारांत रडतरावासारखं उभं रहायचं— मी या पांगाऱ्याच्या झाडाआडून हातपाय आपटीत येन नि पांडवांच्या

आईबापांचा उद्धार करीत तुज्या वस्त्राला हात घालीन...काय...तुझ्या वस्त्राला हात घालीन...हा हा हा हा...हा हा हा हा...'

दसऱ्याच्या आदल्या रात्रीं बाबाचं नाटक व्हायचं होतं. त्या दिवशीं सकाळपासूनच बाबाची नि माझी निष्कारण धांवाधांव चालली होती. आये आम्हांला सारखी घालूनपाडून शिव्या घालीत होती, करवादत होती. पण आज आमचं नाटक असतांना आम्हीं थोडेच तिला भीक घालायला बसलों होतों! करवादेल, करवादेल नि बसल आपणच मुकाट.

बाबानं डोळा घालून मला खूण केली. एखाद्या सराईतासारखा मी बावळट चेहरा केला नि आयेच्या पाठोपाठ सैंपाकघरांत घोटाळलों. आये बराच वेळ बाहेर जाईना. पण नाहीं म्हणतां तिला शेवटीं धुणीं घेऊन बाहेर पडावंच लागलं. ती बाहेर पडल्याबरोबर, ती पैशे ठेवीत असे त्या डबीला मीं हात घातला नि तिच्यांतली एक पावली लंपास केली.

त्यांतले दोन आणे मीं नि बाबानं खाल्ले. मीं आण्याचीं भजीं बोकमलीं. बाबानं पैशाची खडीसाखर, पैशाचा कंकोळ नि दोन दिडक्यांच्या लिमलेटच्या गोळ्या घेतल्या. लिमलेटच्या गोळीसाठीं मी हात पुढं करतांच त्यानं मला चापलं नि म्हणाला, 'बेंबट्या, आज माझं नाटक हाये. जरा आवाज सुटूं दे. यांतल्या राहिलेल्या गोळ्या उद्यां तुलाच...ऑं?...' राहिले दोन आणे. बाबानं त्यांतला एक आणा कानाच्या भोंकांत घट्ट बसवला नि उरलेली आणेली गुंडा न्हाव्याच्या हातावर ठेवून त्यानं आपल्या मुस्कटावरचं जंगल खरवडून घेतलं.

बाबा गुंडाकडून दाढी करून घेत होता तेव्हां सहजच मीं त्याला विचारलं, 'काय रं बाबा, आज तूं यवडा झकपक दाडी करून घेतोयस तो काय त्या दुशासनाला दाडी नव्हती म्हून?'

गुंडानं नाकावर धरलेला वस्तरा किंचित् वर उचलल्याची संधि साधून बाबा खो खो हांसला, नि आरशांतून माझ्या बिंबाकडे रेंकून बघत म्हणाला, 'आरं बेंबट्या, हा नाटकांतला दुशासन हाय. त्यो झकपक पायजे. आर तुला म्हायती नाय. तकडं ममईला नाटकं व्हत्याती त्यांतली कुब्जाबी शूरपनकेवानी फांकडू दिसाया व्होवी. आरं नायतर तुमच्या नाटकावर कुटलं कुतरडं मुताया बसलंया ऑं?...'

संध्याकाळीं आम्हीं लौकर जेवून वेताळगढीवर गेलों. बाबा छाती पुढं काढून अंगावरून जाणाऱ्यायेणाऱ्याला धक्के मारीत मोठ्या तोऱ्यांत चालत होता. लोकांना ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानं तो वरचेवर मला बजावीत होता; 'बेंद्रट्या पोरा, अर असं फक्कड काम करतों आज दुशासनाचं कीं यंव रे यंव...'

पण कुणीच बाबाकड बघत नव्हतं. मला त्याची दया येत होती. नाटकांत काम करावं तर भीमाचं नाहींतर कुठचंच करूं नये असं मलाही वाटत होतं. रात्रीं भीम झालेला येशा बुडकुले याच्या उरावर बसून याला चांगलाच बुकलणार या विचारानं मला भडभडून येत होतं.

काळोख पडत चालला तशी इतर मंडळी जमूं लागली. पडदे लागले. गॅसच्या बत्त्या भगभगूं लागल्या. रंगवाला आला. नाटकांतल्या पार्टीचीं थोबाडं रंगूं लागलीं. माझ्या बाबानंही खोट्या खोट्या मिशा लावल्या नि आरशांत पाहून तो त्यांना पीळ देऊं लागला. मग त्यानं सोनेरी बेगड लावलेला मुकूट डोक्यावर बांधला नि माझ्या पाठीवर जोरानं थाप मारून त्यानं विचारलं, 'काय पोरा, कसा काय दिसतो ?'

त्याच्या त्या विलक्षण ध्यानाकडे बघून मनांतल्या मनांत हंसून मीं खवचटपणानं म्हटलं, 'बाबा, अगदीं किरीष्णावाणी दिसतोस बघ !'

तेवढ्यावरच माझा बेअकली बाप खूष झाला. माझ्या बोलण्यांतला अवखळ अर्थ त्याच्या मठ्ठड डोक्यांत कुठला शिरायला !

बाबाचा सगळा नट्टापट्टा झाल्यावर मी बाबाला त्यानं कानांत ठेवलेल्या आणेलीची आठवण करून दिली. तशी तो म्हणाला, 'पोरा, बरी आठवण केलीस. चाल, आपून समोरच्या दुकानांतून चाय खाऊन येऊं.'

मग दुःशासन झालेला बाबा नि मी चायच्या दुकानांत गेलों. बाबाच्या झगझगीत ड्रेसकडे सगळींजणं आ वासून बघूं लागलीं. माझ्याही अंगावर त्यामुळं मूठभर मांस चढलं. चायवाल्यानं एका आण्यांत आम्हांला दोन कोप चाय दिली. त्यांतली दीड कोप चाय एकटा बाबा प्यायला. म्हणाला, 'माझं नरडं तापूं दे.'

धा–साडेधाला नाटक सुरू झालं. नाटकाला तोबा गर्दी झाली होती. मी विंगांत बसून नाटक बघत होतों.

नाटक सुरू होऊन थोडा वेळ होतो न होतो, तोंच आये कमळीला घेऊन आली नि बायकांत जाऊन बसली. आये आली तेव्हां बाबा किरिष्णासंगं भांडत होता. तरीही विंगांतून डोळा घालून मी त्याला खूण केलीच. पण त्याच्या दगडी डोक्यांत कांहींच शिरलं नाहीं.

हळूहळू नाटक चढूं लागलं. धूर्तराष्ट्राच्या दरबारांतला जुगाराचा शीन झाला. कौरवांनीं पांडवांना टांग मारली. अखेर पांडवांनीं द्रवपदीला पणाला लावली. शकुनीमामानं तोही जुगार जिंकला. दुःशासनानं द्रवपदीला भर दरबारांत फरफटत आणली नि राक्षसासारखं हंसून तो तिचं वस्त्र फेडूं लागला. त्याचवेळीं द्रवपदीनं किरिष्णाचा धांवा केला. तिचा हा धांवा तब्बल तासभर चालला होता. पेटीवाल्याला घाम आला. तबल्यावर बसलेला शंकऱ्याही थकला तरी द्रवपदीचा पार्ट करणारा सख्या त्यांना बधेना. त्याचं आपलं आऽऽउंऽऽ चाललंच होतं नि बाबा आपला बावळटासारखा त्याच्या पदराला हात घालून उभा होता...

सख्याच्या गाण्याला टाळ्यांवर टाळ्या पडल्या नि वन्समोर झाला तशी बाबानं कपाळावर हात मारून सख्याच्या कानांत दम भरला, ‘सख्या, आतां एक लायन गाशील तर इथनं धूम ठोकीन ! बा झवत गेलं मग तुमचं नाटक ब्रिटक–”

मीं मनांतल्या मनांत बाबाला शाबासकी दिली नि म्हटलं ‘असा हवा दुशासन. भीमड्याच्या तोंडांत मारील असा ’...

रात्रीं एक वाजतां लढाईचा शीन लागला. भीमाची नि दुःशासनाची तुंबळ लढाई जुंपली. भीमानं एक गचांडी मारून माझ्या बाबाला पाडला नि तो त्याच्या उरावर बसून त्याला बुकलणार, तोंच काय झालं एकाएकीं कुणास ठाऊक... बहुधा बाबाची नि आयेची नजरानजर झाली असावी...

एकदम त्यानं भीमाच्या पोटावर गुद्दे मारायला सुरवात केली. आपली बायको नाटक बघायला आली आहे अन् तिच्या समोर मी या गलथान, गुबदुल ढेरपोट्याकडून बुकलून घेऊं?...नाटक झालं म्हणून काय झालं...?

हां हां म्हणतां भीमाची नि माझ्या बाबाची खरोखरीची कुस्ती स्टेजवर जुंपली. लोकांना वाटलं हा नाटकांतला शीन आहे. दुःशासन लढेल लढेल पण अखेर त्याला चीत व्हावंच लागेल....

पण यावेळीं दुःशासन चीत होणार नव्हता. त्यानं भीमाच्या पोटावर पुन्हां एकदां गुद्दे लगावायला सुरवात केली. भीम 'ओय ओय' करून बोंबलूं लागला. लोक बसल्या जागेवरून उठून भीमाला चिथावणी देऊं लागले. 'अरं धर तंगडं नि खेच कीं लेकाऽऽ...' 'अर हा भीम हाय कीं मुरदाड कुतरडं हाय?'... कांहीं केल्या कुस्ती निर्णायक होईना. नाटकांत लिहिलं होतं तरी दुःशासन माघार घेईना. भीम सारखा त्याला खुणवीत होता. 'अरं, काय करतोयस काय?' —

बाबा त्याला म्हणाला, 'बस्स, आतां मी कुनाच्या बाचं बी ऐकणार नाय. आज माझी बया आलीया नाटकाला. तिच्यापुढं मी असला अपमान...'

अखेर पडदा पाडून नाटकाचा अंक खलास करावा लागला. नाटकाचा बट्ट्याबोळ केल्याचा आरोप जो तो माझ्या बापावर करूं लागला. पण मला तें बिल्कूल पटत नव्हतं. बाबानं भीमाकडून बुकलून घेतलं असतं तर त्याला घरीं जायला नको होतं. अन् हें लोकांना कुठं ठाऊक होतं?

फक्त नाना अभ्यंकरांचा मुंबईला राहाणारा भावड्या नाटकाला आला होता. 'त्याच्यावर कशाला ओरडतां हकनाक? त्यानं नेहमींच्या रडतराऊ नाटकाला आज नवा अर्थ प्राप्त करून दिला आहे. नेहमीं नेहमीं दुःशासनानं भीमाकडून मार खायचा हें आजच्या यंत्रयुगांतील समाजाला पटणार नाहीं... पटूं नये...' किती तरी तो बोलत होता. मला त्यांतलं कांहीं कळत नव्हतं. पण पटत मात्र होतं सगळं...

सकाळीं आम्ही घरीं आलों तेव्हां बाबा छाती पुढं काढून घरांत शिरला. आये त्याच्याकडे पाहून गालांतल्या गालांत हंसत होती नि कमळाकडे पाहून म्हणत होती, 'काय पण येडं ध्यान हाये!...अहाहा!'

एकंदरींत ती बाबावर खूष होती नि त्यामुळं मला कितीतरी दिवसांनीं बरं वाटत होतं.

१९५१

* * *

: १० :

# अमावास्या

आज अमावास्या आहे का ? तेव्हांच शंभूनानांनीं दुपारीं गफूरकडून कोंबडं आणून ठेवलं आहे ! आज तिन्ही सांजा उलटल्या कीं, दिवेलागणीच्या सुमारास शंभूनाना, आबा वालावलकरांच्या पडक्या घराच्या परसांतील त्या भयाण पिंपळाखालीं जातील नि कुणाची तरी वाट बघूं लागतील. पण त्यांना फार वेळ तिष्ठत राहावं लागणार नाहीं. अगदीं दर अमावास्येच्या रात्रीचा त्यांचा अनुभव आहे हा. गेल्या पंचवीस वर्षांत या ठरलेल्या गोष्टींत एक कणसुद्धां बदल घडून आलेला नाहीं. शंभूनानांना पिंपळाच्या पाराखालीं येऊन दहापंधरा मिनिटं होतात न होतात तोंच कुठून तरी एक कर्कश भयाण किंकाळी ऐकूं येईल. किंकाळी बरोबर कुठून येत आहे हें सांगतां येणार नाहीं, पण साधारणतः ती त्या पिंपळाच्या झाडावरून येत असल्याचा भास होईल. किंकाळी नक्की कुणाची आहे हेंहि सांगतां येणार नाहीं. पण साधारणतः ती एका स्त्रीची आहे हें सहज ओळखतां येईल. ' शंभू...शंभू...शंभ्या...अखेर ...अखेर मी तुझ्याबरोबर लग्न केलंच कीं नाहीं ? ' असा प्रश्न ती पिंपळावरची अदृश्य बाई शंभूनानांना करील. मग थोडा वेळ जिकडे तिकडे स्तब्धता पसरेल. दरडीच्या फटींतले रातकिडे किरकिरूं लागतील. आसपासच्या घरांतून धूर ओकीत राहाणारीं तेलाचीं डबरीं थरथरूं लागतील. अन् मग कुठून तरी एक वाऱ्याची झुळुक येईल. पहातां पहातां ती पिसाळलेल्या भिंगरीसारखी भिरभिरूं लागेल. पिंपळाचीं पानं झपाटल्यासारखीं होतील. आसमंतांत पुन्हां क्षणभर स्मशान-शांतता पसरेल. अन् मग...अन् मग...अन् मग पिंपळावरची ती अदृश्य बाई

दांत विचकून हसूं लागेल,...ही ही ही ही...ही ही ही ही...ही ही ही ही शंभूनाना डोळे तारवटून त्या पिंपळाकडे पाहतील. त्यांचे डोळे पाण्यानं डबडबून निघतील. ध्यानींमनीं नसतांना, क्षणापूर्वी एखाद्या वेड्यासारखी सैराट हंसणारी ती बाई हेल काढून मोठमोठ्यानं रडूं लागेल. मग शंभूनाना एक दीर्घ निःश्वास सोडून दोन पावलं पुढं सरकतील, त्या पिंपळाच्या बुंध्याला हात लावून वर पाहिल्यासारखं करतील, नि तोंडानं कसले तरी मंत्र गुणगुणत ते पिंपळाला दहा-बारा प्रदक्षिणा घालतील. त्यांच्या प्रदक्षिणा घालून होईपर्यंत शंभूनानांचा गडी एका हातांत कोंबडं नि दुसऱ्या हातांत उदबत्त्या, लिंबू, गुलाल कापूर इत्यादि साहित्य असलेलं तबक घेऊन तिथं येईल. शंभूनाना मंत्र म्हणत लिंबू कापतील नि त्यांत गुलाल माखून तें त्या आवाजाच्या दिशेनं फेंकतील. मग एका लिंबांत उदबत्त्या रोवून त्या पेटवतील. त्यानंतर कापूर शिलगावला जाईल. आजूबाजूची पालापाचोळ्यानं भरलेली जागा कापराच्या भयाण प्रकाशांनं लिंपून निघेल. अन् मग शंभूनानांचा गडी डाव्या हातांत त्या कोंबड्याच्या तंगड्या नि उजव्या हातांत त्याची मान धरून ठरलेल्या पवित्र्यांत बसून राहील. शंभूनाना पुन्हां एकदां त्या पिंपळाला प्रदक्षिणा घालून येतील नि पाहतां पाहतां हातांतल्या चाकवानं त्या केंकाटणाऱ्या कोंबड्याची मान उडवतील. एक अखेरची आर्त किंकाळी ऐकूं येईल. एक दोन रक्ताच्या चिळकांड्या उडतील. सेकंद दोन सेकंद मानेपासून वेगळं झालेलं धड तडफडत राहील. मग शंभूनाना तें कोंबडं पिंपळाच्या बुंध्याला लावून ठेवतील नि वर पहात मोठ्यानं म्हणतील, ‘ तुझं देणं पिंपळाच्या बुंध्या-पाशीं ठेवलंय गेऽऽ ! या शंभूनं जगांत कुणाचं कधीं वाईट केलं नाहीं. वाईट चिंतिलं नाहीं. हें तुझं कोंबडं घे...हा गुलाल...हें लिंबू ...उदबत्त्या...वेताळ तुझं भलं करो ! ’ पुन्हां एकदां आकाश फाडून टाकणारी किंकाळी त्या पिंपळावरून ऐकूं येईल. वाऱ्याच्या झोताचा फिरता भोंवरा कुठूनसा भिरभिरत येईल नि पहातां पहातां निघून जाईल. मग सारं शांत होईल. शंभूनाना नि त्यांचा गडी दोघेहि घरांत येतील...

अगदीं असाच प्रकार पुढच्या अमावास्येला होईल...अगदीं असाच प्रकार तिच्या पुढच्या अमावास्येला होईल...तिच्या पुढच्या...तिच्या पुढच्या... तिच्या पुढच्या...

सकाळींच खापर्ड्यांहून निरोप आला म्हणून आबा आठ साडेआठच्या सुमारास आपल्या बादशहा नांवाच्या तट्टावर स्वार झाले नि खापर्ड्याला निघाले. घरांतून निघतांना ते देवघरांत गेले नि दत्ताच्या मूर्तीला पाया पडून म्हणाले, 'दत्तात्रेया, या खेपेला तरी आमच्या अक्काचं जमूं दे! आजचं हें सत्ताविसावं स्थळ. या खेपेला तिचं नाहीं जमलं तर मी...मी स्वतः तिच्या गळ्याला धोंड बांधीन नि तिला विहिरींत लोटून देऊन मीहि दगडावर डोकं आपटून प्राण देईन!' पटकन् त्यांच्या डोळ्यांच्या कडांतून एक अश्रु ओघळला नि खालींच तेवत असलेल्या समईवर पडला. समईतलं तेल क्षणभर चरचरलं. तट्टावर बसतां बसतां आबांनीं उंबरठ्यांत उभ्या असलेल्या सावित्रीबाईकडे वळून पाहिलं नि आपल्या घुमणाऱ्या पहाडी आवाजांत म्हटलं, '–येतों बरं का आम्हीं. या खेपेला अक्काचं बहुधा जमेल असं वाटतं!' आबांचं हें वाक्य सावित्रीबाईच्या आतां इतकं परिचयाचं झालं आहे कीं, त्यामुळं त्याचा साधा अर्थहि त्यांच्या लक्षांत येत नाहीं. आपली मुलगी रूपानं कुरूपांतच मोडण्यासारखी आहे नि थोडीशी अर्धवटहि आहे याची त्यांना पक्की जाणीव आहे. स्वतःच्या पोटच्या गोळ्याच्या लग्नाचा प्रश्न असूनसुद्धां त्यांचं मन त्यांना अजूनहि सांगत आहे कीं, या जन्मीं कांहीं अक्काचं लग्न होत नाहीं. नाहीं नाहीं म्हणतां अठरा वर्षांची झाली कीं! अन् या दिवसांत अठरा–अठरा वर्षांपर्यंत लग्नाची राहिलेली एक तरी मुलगी शोधून सांपडेल का! अक्काच्याच बरोबरीच्या मुलींना आज तीन तीन मुलं आहेत...अन्...

अन् तरीहि त्या आबा दृष्टीआड होईपर्यंत उंबरठ्यांत उभ्या राहिल्या. आबा तट्टावर बसून दुडदुडत निघाले. नवा पूल मागं गेला, रामाच्या देवळाचा कळस दिसेनासा झाला, त्रोथाटीचा डोंगर दिसूं लागला, बादशहा तरट्याच्या रानच्या दिशेनं पावलं टाकूं लागला. दोन अडीच तासांत आबांनीं तीन-साडेतीन कोसांची मजल गांठली. सूर्य डोईवर आला, तेव्हां आबा तरट्याच्या अगदीं भर जंगलांत होते. एका कडूलिंबाच्या झाडाच्या सांवलीला ते उतरले नि सावित्रीबाईनीं दिलेली दशमी त्यांनीं सोडली. दशमी खाऊन झाल्यावर त्यांनीं डोळ्यावर हात धरून आजूबाजूला नजर फेंकली तेव्हां हांकेच्याच अंतरावरून एक ओढा वहात असल्याचं त्यांना दिसलं.

बादशहाला घेऊन ते ओढ्यावर आले नि त्याला भरपूर पाणी पाजून झाल्यावर मग स्वतः ते पाणी पिण्यासाठीं म्हणून खालीं वांकले. ओंजळींत पाणी घेऊन त्याला तें तोंड लावणार इतक्यांत...इतक्यांत जवळूनच कुठून तरी कुणाच्या तरी रडण्याचा आवाज ऐकायला येत आहे असं त्यांना वाटलं. प्रथम त्यांच्या मनांत आलं कीं, हा नुसता भास असेल. म्हणून तिकडे यत्किंचितहि लक्ष न देतां त्यांनीं पुन्हां आपली ओंजळ पाण्यानं भरली. पण ओंजळींतल्या त्या पाण्याला त्यांचे ओंठ लागतात न लागतात तोंच तो रडण्याचा आवाज त्यांना पुन्हां ऐकूं आला. कान देऊन ते नीट ऐकूं लागले. या एवढ्या घनदाट जंगलांत एखादी स्त्री रडत असेल ही कल्पनाच मुळीं त्यांच्या दृष्टीनं अशक्य कोटींतील होती. पण बराच वेळ झाला तरी तो आवाज पुन्हां कांहीं येईना. आबांनीं डोळे किलकिले करून आसपास पाहिल्यासारखं केलं नि पुन्हां त्यांनीं आपली ओंजळ पाण्यानं भरली. पण ओंजळींतल्या त्या पाण्याला त्यांचे ओंठ टेंकतात न टेंकतात तोंच...तो रडण्याचा आवाज येत होता त्या दिशेनं एक भयंकर किंकाळी त्यांना ऐकूं आली. स्वतः अत्यंत निर्भय असूनसुद्धां क्षणभर त्यांच्या पोटांत भीतीचा गोळा उभा राहावा एवढी चमत्कारिक ती किंकाळी होती. ओंजळींतलं पाणी तसंच टाकून ते ताड्दिशीं उभे राहिले नि नजर गोफणगोट्यासारखी आजूबाजूच्या प्रदेशावरून भिरकावीत त्यांनीं बादशहाच्या पाठीवर थाप मारून म्हटलं, 'बादशहा, कुणाचा रे हा आवाज?' उत्तरा-दाखल बादशहानं आपली नाकपुडी फुरफुरवली नि डावीकडचा पुढचा पाय गुडघ्यांतून वांकवून त्यानं आपली आयाळ झटकल्यासारखं केलं.

मध्यंतरीं क्षणभर स्तब्धावल्यासारखं झालं होतं, पण आतां मात्र मघाचाच तो रडण्याचा आवाज न थांबतां ऐकूं येऊं लागला. आबांच्या लक्षांत यांतला कांहींच प्रकार येईना. त्यांनीं आपल्या डोईवरचं पागोटं नीट केल्यासारखं केलं. डगल्यावरचा शालीचा एक शेवगा उजव्या खांद्यावरून मागं सोडला नि आवा-जाच्या दिशेकडे वळून ते मोठ्यानं गरजले, 'कोण आहे?...कोण रडतं आहे?...हो ऽऽऽ कोण रडतं आहे?' पुन्हां तो आवाज ऐकूं येईनासा झाला. आबांचे शब्द खालच्या दरींत प्रतिध्वनित झाले. पुन्हां त्यांनीं कमरेवर हात घेतले नि त्या आवाजाच्या दिशेकडे वळून ओरडले, 'अरे ए ऽऽऽ कोण रडतं

आहे तें !...बोलवत नाहीं काय ?...' या वेळीं मात्र तो रडण्याचा आवाज पुन्हां ऐकूं येऊं लागला.

आतां आब्रांना धीर धरवेना. बादशहाला बरोबर घेऊन ते जंगलाच्या पोटांत शिरले नि 'कोण रडतं आहे तें!' असं मोठ्यांदा ओरडले. इकडे तिकडे शोधूं लागले. बराच वेळ शोधशोध शोधल्यानंतर त्यांना एक दहा अकरा वर्षांची मुलगी एका मोठ्या दगडावर बसून मोठमोठ्यानं रडत आहे असं दिसलं. क्षणभर ते जागच्या जागीं थबकले, नि त्या मुलीकडे लक्षपूर्वक पाहूं लागले. मग ते तसेच पुढं सरकले नि त्या मुलीजवळ गेले. बराच वेळ झाला तरी ती मुलगी गुडघ्यांत घातलेली मान वर करून पाहीना. आपल्या-जवळ कुणी दुसरं माणूस आलं आहे याची तिला दाद नसावी.

आब्रांनीं तिच्या पाठीवरून हात फिरवून विचारलं, 'मुली, तूं कोण? कुणाची? इथं कशी आलीस?'

तिनं क्षणभर आब्रांच्या नजरेला नजर दिली नि ती पुन्हां हेल काढून रडूं लागली.

'मुली, उगी रहा. उगी...उगी...तूं वाट का चुकली आहेस?'

'नाहीं.'

'मग या रानांत कशी आलीस?

'माझ्या बापानं मला इथं आणून सोडली!'

अजून तिला आपले हुंदके आवरत नव्हते.

'तुझ्या बापानं? कां?'

'तो म्हणाला, मला सात मुली आहेत. या सगळ्यांचं काय करूं? तुम्हीं एकेकीनं घराबाहेर जा अन् आपापलीं नशीबं शोधा. आम्ही दोघं गळ्यांत धोंड बांधून...'

'कुठल्या गांवची तूं?'

'इथल्याच...'

'इथल्याच म्हणजे कुठल्या?'

'सरपदळीची.'

‘ तुझा बाप तिथं काय करतो ? ’

‘ कांहीं नाहीं. मिळतील तीं किडुकमिडुक कामं करतो. ’

मग आबा बराच वेळ तिच्याकडे टक लावून पहात कसला तरी विचार करीत राहिले. थोडा वेळ कुणींच कुणाशीं बोललं नाहीं.

‘ तूं माझ्याबरोबर चलतेस का ? ’

‘ कुठं ? ’

‘ माझ्या घरीं. ’

‘ पण तिथं येऊन काय करूं ? अन् तुम्हीं गळ्यांत धोंड बांधून जीव दिलात तर. . .! ’

हें उत्तर ऐकून आबा क्षणभर स्वतःशींच हंसले नि म्हणाले,

‘ मला तुझ्या बापासारख्या सात मुली नाहींत कांहीं जीव द्यायला. तुला ताई शोभेल एवढी एकच मुलगी आहे मला. मग येतेस ? ’

चोळीच्या बाहीनं डोळे पुसतां पुसतां ती मुलगी उठून उभी राहिली नि आबांचा हात आपल्या हातांत घेत म्हणाली, ‘ आजपासून तुम्हीं माझे बाबा. चला—’

आबांनीं बादशहाच्या पाठीवर थाप मारली, तशी तो मोठ्या रुबाबांत फुरफुरला.

आबांनीं त्या मुलीला उचलून बादशहाच्या पाठीवर बसवली नि त्याची पाठ थोपटीत ते म्हणाले, ‘ चला आतां. आतां वाटेंत कुठं थांबायचं नाहीं. सरळ खापर्ड्यांला. ’

खापर्ड्यांला जाईजाईपर्यंत आबा सारखे त्या मुलीबद्दल विचार करीत होते.

मुलगी दिसायला चित्रासारखी रेखीव होती. रंगानं गोरीपान. केतकीच्या पात्यासारखी. टपोऱ्या डोळ्यांची.

राहून राहून त्यांना मुलीचे ते शब्द आठवत होते, ‘ आजपासून तुम्हीं माझे बाबा. चला. ’

आबा खापर्ड्यांला पोंचले तेव्हां दुपार टळून गेली होती. खापर्ड्यांला

त्यांचा मोठा भाऊ रहात होता. हा तरी कुठंतरी आपल्या मुलीचं जमवील म्हणून त्यांनीं अक्काला त्याच्या इथं पाठविलं होतं.

महिनाभर खापड्यांला राहूनसुद्धां अजून अक्काचं कुठं जमलं नव्हतं. यापुढं अक्काचं कुठं जमेल असं त्यांनाहि वाटत नव्हतं. पण जिवांत जीव असेतोंपर्यंत हातपाय हलवीत रहायचं आपलं कर्तव्य बजावण्यास ते मनाचा हिय्या करून पुढें सटकले होते...

आबांनीं अलगद त्या मुलीला खालीं उतरवली नि बादशहाला खळ्यांतच असलेल्या पांगेऱ्याच्या झाडाला बांधून ठेवलं. इतक्यांत आबा आल्याची वर्दी कुणीतरी घरांत नेऊन पोंचवली. त्याबरोबर घरांतील झाडून सारीं माणसं ओस्यावर आलीं नि आबांकडे टकामका पाहूं लागलीं. आबांचा मोठा भाऊ झोंपला होता, तो एकदम उठला नि बाहेर आला.

या खेपेस आबांना घरांतलं एकंदर वातावरण बरंचसं चमत्कारिक वाटलं. हें काय हें ? कुणी कुणाशीं बोल्त नाहीं...चालत नाहीं ! अं... ?...अरे काय झालं आहे काय या लोकांना आज ? अन् माझी अक्का...अक्का नाहीं कुठं दिसत ती... ? बिचारी...बिचारी...बापाला तोंड दाखवायलाहि लाजते कीं काय ? पण बापडी ती तरी काय करणार ?...काय करणार ? देवानं जन्म दिला पण रूप दिलं नाहीं. देवानं देह दिला पण मन भोसळटच ठेवलं. देवानं निर्माण केली, पण विष खायलाहि पैसे नसलेल्या बापाच्या पोटीं जन्माला घातली. काय करूं ? —मी तरी काय करूं ?...शेजारच्या कुळकर्ण्यांचा तो शंभू आपला जांवई करून घ्यावासा वाटतो...पण कोणत्या हातानं त्या राजबिंड्या...गोंडस पोराच्या गळ्यांत ही कुरूप पोर बांधूं ?...कोणत्या तोंडानं त्याच्या दारीं जाऊन आमच्या मुलीशीं लग्न करतां का हो म्हणून विचारूं ?..पण हे लोक आज असे चमत्कारिकपणानं गप्प कां ?...कां ?... कां ?...

आबांचा मोठा भाऊ पुढं झाला नि म्हणाला, ' आलास ? ' अन् त्यानं आंत उभ्या असलेल्या मंडळीकडे नजर टाकली.

इतक्यांत कुणीतरी पुढं झालं नि त्यानं मुकाटतोंडीं पाण्यानं भरलेला एक पितळेचा तांब्या पायरीवर आणून ठेवला.

आबांनीं डोईवरचं पागोटं काढून खुंटाळ्याला अडकवलं. खांद्यावरच्या

रुमालाचा शेवगा धरून गरगर फिरवला नि बरोबर आणलेल्या त्या मुलीला ते म्हणाले, ‘ जा, आंत जा. हातपाय धू नि दोन घास खाऊन घे. ’

सगळींजणं भुंवया वर चढवून प्रश्नार्थक नजरेनं तिच्याकडे पहात होतीं.

आबांच्या मोठ्या भावानं विचारलं, ‘ ही मुलगी कोण ? ’

आबा म्हणाले, ‘ मग सांगेन. पण अक्का कुठं आहे ? ’

आबांचा मोठा भाऊ आबांचा हा प्रश्न ऐकून थोडासा चरकला नि लगेच स्वतःला सांवरून घेत तो म्हणाला, ‘ त्याच्यासाठींच तर तुला बोलावून घेतला एवढ्या तांतडीनं ! ’

हें वाक्य ऐकतांच आबांचे डोळे एकदम तारवटले. आश्चर्यचकित होऊन त्यांनीं विचारलं, ‘ म्हणजे ? ’

‘ अक्का मध्यरात्रीपासून कुठंतरी बेपत्ता आहे. सारखा शोध करतों आहोंत. काल रात्रीं ती चांगली जेवली, नेहमींप्रमाणं भाजी नीट करायला बसली नि कुणाशींच कांहीं न बोलतां झोंपी गेली. रात्रीं बनूआत्यांना थोडा संशय आला म्हणून... ’

पण हें सारं ऐकायला आबा भानावर कुठं होते ?

मध्यरात्रीपासून अक्कासाठीं अव्याहत शोधाशोध चालली होती. जो हाताशीं गावेल त्याला कुठं कुठं पिटाळण्यांत आलं होतं. बिछव्याच्या डोंगरा-पासून रानसराईच्या मैदानापर्यंतच्या साऱ्या मुलखाचे काना न् कोपरे धुंडाळ-ण्यांत आले होते. पोलिसांत वर्दी गेली होती.

अखेर दिवेलागणीच्या सुमारास कुणीतरी वर्दी घेऊन आला कीं, अक्का मिळाली. दुपारपासून निश्चेष्ट होऊन पडलेले आबा, हें ऐकतांच ताड्दिशीं उठून उभे राहिले नि ‘ कुठं...कुठं ? ’ असं ओरडत, एखाद्या वेड्यासारखे, खळ्याच्या रिंगणांत सैरावैरा पळूं लागले. पुन्हां त्यांना ग्लानि आली...

मसणवटीच्या पलीकडे असलेल्या शेवाळाच्या हिरव्या कफनाखालीं दडलेल्या, पडक्या दगडांचे चिरे असलेल्या भुताटकीच्या विहिरींत पोलीसांना अक्काचं प्रेत मिळालं होतं. प्रेताच्या डोळ्यांचीं बुबळं बाहेर लोंबत होतीं. तोंड सताड उघडं होतं. कुरूप अक्काचं तें प्रेत अधिकच भयंकर दिसत होतं.

हां हां म्हणतां ही बातमी खापर्डीच्या पंचक्रोशींत पसरली.

आठ-साडेआठच्या सुमारास पंचानामा झाला. प्रेत ताब्यांत मिळायला बारा-साडेबारा वाजून गेले. त्यानंतर माणसं पुढच्या तयारीला लागलीं. आबांना अजून वरचेवर मूर्च्छा येतच होत्या.

दुसऱ्या दिवशीं उन्हं अंगावर आलीं तेव्हां आबा सावध झाले. शुद्धीवर आले नि इकडे तिकडे पाहूं लागले.

पांगेऱ्याच्या झाडाला त्यांनीं काल बांधून ठेवलेला बादशहा अजून तसाच होता. वाळलेल्या गवताची अर्धवट कुरडलेली एक पेंडी तो चघळीत होता. आबांना पाहातांच तो मोठ्यानं खिंकाळला.

आबांनीं त्याच्याकडे पाहिलं, तेव्हां पांगेऱ्याच्या झाडाला कसलंतरी बोचकं बांधून ठेवलेलं त्यांना दिसलं.

हळूहळूं त्यांना अक्काची सारी हकीगत कळली. हृदयाचा दगड करून त्यांनीं ती ऐकली नि समोरच्या पांगेऱ्याकडे पहात त्यांनीं एक दीर्घ निःश्वास सोडला.

तिसऱ्या दिवशीं ते त्या मुलीला घेऊन घरीं परतले, तोंपर्यंत अक्काची सारी हकीकत घरीं कळलीच होती.

आबांना आलेले पहातांच सावित्रीबाईनीं मोठ्यांदा हंबरडा फोडला. आबा तिचं सांत्वन करतां करतां म्हणाले, ‘ झालं तें होऊन गेलं. आतां शोक करण्यांत काय अर्थ आहे ? नशिबांत व्हायचं असेल तें कुणाला कधीं चुकलं आहे का ? आपल्यापरीनं कुठल्याहि प्रकारची कुचराई आपण केलेली नाहीं. दैवानं एक मुलगी खाल्ली, पण ही पहा...ही पहा देवानं दुसरी एक मुलगी आपल्याला दिली आहे !...’

अन् त्या दिवसापासून ती मुलगी आबांच्या घरीं वाढूं लागली. आबा तिचे बाबा झाले. सावित्रीबाईनीं तिच्यावर मातृत्वाची छत्री धरली. आबांनीं तिचं नांव ठेवलं-अन्नपूर्णा.

अन्नपूर्णा घरांत आल्या दिवसापासून आबा वालावलकरांच्या घरांत समृद्धीचा मळाच मळा पिकला. अशींच तीनचार वर्षें गेलीं.

एक दिवस आबा शेजारच्या कुळकर्ण्यांकडे गेले नि म्हणाले, ' शंकरराव, तुमचा शंभूनाना आमचाच जांवई झाला पाहिजे. आमची अन्नपूर्णा पहा कशी केतकीसारखी गोरीपान आहे ! '

अखेर बरींच बोलणींचालणीं झाल्यानंतर शंभूनानांच्या वडिलांनीं आबांच्या मागणीला होकार दिला. आबांचा आनंद गवनांत मावेना. पायाला पंख बांधून ते इकडेतिकडे हिंडूं लागले. येत्या वैशाखांत...येत्या...येत्या... वैशाखांत आमच्या अन्नपूर्णेचं लगीन आहे...हं...होय...शंकरराव कुळ-कर्ण्यांच्या शंभूनानाशीं. अं...?...ह्या होऽऽ...आपल्या येत्या वैशाखांत...'

अखेर आबांच्या मनांत होतं तसं झालं. शंकररावांचा शंभू आपला जांवई व्हावा ही त्यांची फार वर्षांची इच्छा अखेर साकार झाली. त्यांना वाटलं, आपल्या मूळच्या कुंडलींत दैवाची कांहींतरी चूक झाली असावी, ती आतां सुधारण्यांत येत आहे. अन्नपूर्णेच्या लग्नाला त्यांनीं कुठून कुठून तीन-चार हजार रुपये जमविले. गोट, पाटल्या, सरी, मोहनमाळ, कुडीं असा मिळून जवळ जवळ दोन शेरांचा ऐवज त्यांनीं देवानं दिलेल्या आपल्या मुलीच्या अंगावर चढविला. उभ्या गांवाला आमंत्रण गेलं. बहिरोबाच्या देवळासमोरच्या विस्तीर्ण आवारांत मंडप उभारला गेला. बाहेरगांवाहून जवळ जवळ शंभर माणसांचं वऱ्हाड लग्नाला आलं. लग्नाच्या गडबडींत धांवाधांव करणारे, ' अरे, हें कुठं आहे ?...अरे, तें कुठं आहे ? ' करणारे आबा दिसले कीं, कांहीं व्यवहारी लोक कपाळावर आठ्यांचं जाळं पसरीत, डोळे तारवटीत नि हळहळल्यासारखं करून म्हणत, ' आबा, आज अक्का हवी होती हो !' आबा त्यांचं बोलणं ऐकल्या न ऐकल्या-सारखं करीत नि आपला रस्ता मुकाट्यानं सुधारीत.

लग्नाची घटका भरली. पिंजरेनं माखलेल्या अक्षता वांटल्या गेल्या. पान-सुपाऱ्यांचीं तबकं घेऊन घरांतील उत्साही पोरं उभीं राहिलीं. अत्तरदाण्यांत अत्तराच्या कुप्या रिकाम्या केल्या गेल्या. गुलाबदाण्यांचे द्रोण गुलाबपाण्यानं भरून निघाले. कवठाच्यां फळाएवढाले बुंदीचे लाडू वळले गेले. भटजींनीं आपल्या अर्धवर्तुळाकारी पोटांत हवा भरून घेतली नि ते मंगलाष्टक कोकलूं लागले. शंभूनाना अन् अन्नपूर्णा यांच्यामधला अंतरपाट काढला गेला. अखेर... अखेर लग्न लागलं. अन्नपूर्णेनं खालच्या मानेनं शंभूनानाच्या गळ्यांत माळ

घातली. अन् शंभूनानांनींहि. कुणीतरी 'वाजवा रे वाजवा' असं बोंबटलं. निमिषार्धांत सनई चौघडा घुमूं लागला.

अरे, पण हें काय ? हें काय ? हें असं काय होत आहे ? अं ?

एकाएकीं लग्नमंडपांत जिकडे तिकडे हलकल्लोळ उडाला. काय झालं, काय होतं आहे याचा पत्ताच कुणाला लागला नाहीं. जो तो सैराट धावूं लागला. काय झालं ?...काय झालं ?...शंभूनाना झीट येऊन पडले...शंभूनाना झीट येऊन पडले ...धांवा...धांवा—कुणीतरी जा रे नि वैद्यांना घेऊन या...जा रे जा...जा...जा...

शंभूनानांच्या डोक्यांवर पाणी मारण्यांत आलं. कांदे कचाकच कचाकच फोडले जाऊं लागले.

आबा आ वासून हा प्रकार नुसता पहात होते. त्यांची बोबडीच वळायची पाळी आली होती.

अर्ध्या–एक तासानं शंभूनाना शुद्धीवर आले. वाळ्याच्या पंख्यानें त्यांना वारा घालण्यांत येऊं लागला.

नवऱ्या मुलीसकट सगळ्या मंडळींना माडीवर पिटाळण्यांत आलं.

शंभूनाना...हें पहा...शंभूनाना...डोळे उघडा...शंभूनाना...मला ओळखलंत ?...मी आबा...आबा...'

शंभूनानांनीं आपले क्षीण झालेले डोळे उघडून वर पाहिलं,...

'आबा...आबा मला भीति वाटतेय् हो !'

'चला, कांहींतरी बोलूं नका. कसली भीति ?'

शंभूनानांचं अंग घामानं नुसतं डबडबून निघालं होतं. '

'मी...मी...'

'काय झालं ?'

'आबा...आबा...'

'अं ?...हा पहा मी इथं आहे. बोला...बोला तुम्हीं—'

"आबा, मी एका हाडाच्या सांपळ्याच्या गळ्यांत माळ घातल्यासारखं मला वाटलं...भूत...भूत...भूत...!'

शंभूनाना एकदांच कर्कश किंचाळले नि पुन्हां...

जिकडे तिकडे एकच हलकल्लोळ झाला होता. शंभूनानांना भूत दिसल्याची बातमी हां हां म्हणतां वाऱ्यासारखी जिकडे तिकडे पसरली. त्यांतल्या त्यांत हुशार होते ते म्हणाले, ‘ लग्न मंडपांत कुठलं आलं आहे भूत ? शंभूनानांना कसलातरी भास झाला आहे. ! ’

तरी कुणीतरी पंचाक्षऱ्याला बोलवायला पाठवलाच.

पंचाक्षरी आला, तेव्हां शंभूनानांनीं नुकतेच डोळे उघडले होते.

पंचाक्षऱ्यानं त्यांना दरडावून विचारलं, ‘ कुठं पाहिलंत भूत तुम्हीं ?

शंभूनानांनीं बोलण्यासाठीं तोंड उघडलं पण त्यांच्या तोंडून शब्दच उमटेना.

‘ बोला...कुठं पाहिलंत भूत तुम्हीं ? लौकर बोला...नाहीं तर छडीनं फोडून काढतों ! ’

‘ बोहल्यावर...मी...मी...एका हाडाच्या सांपळ्याच्या गळ्यांत...’

बोलतां बोलतां पुन्हां त्यांची दांतखिळी बसली.

पंचाक्षरी डोळे मिटून स्वस्थ बसला नि कसला तरी विचार करूं लागला. थोड्या वेळानं तो गरजला, ‘ नवरी मुलगी कुठं आहे ? ’

खरंच...खरंच...कुठं आहे ! नवरी मुलगी कुठं आहे !...अग अन्नपूर्णे...अं ? ...आतां तर ती इथं होती ! ...अं ?...अरे काय, हें चाललं आहे काय ?...

नवरी मुलगी कुठं आहे ?...नवरी मुलगी कुठं आहे ?...

अखेर नवरी मुलगी एकदांची मिळाली. अडगळीच्या खोलींत जाऊन ती एकटीच मुसमुसत बसली होती. तिला चुचकारीत कशीबशी बाहेर आणली.

पंचाक्षऱ्यानं क्षणभर तिच्या डोळ्याला डोळा भिडवला नि खालचा ओंठ दातांनीं दाबत तो म्हणाला, ‘ हूं ! ’

बरोबर आणलेल्या कुसव्यांतून त्यानं दोनचार लिंबं काढून ठेचलीं...अन् तेवढ्यांत...

सगळ्यांच्या हाताला हिसडा देऊन नवरी मुलगी किंचाळत आंत पळाली...पुन्हां जिकडेतिकडे धांवाधांव सुरू झाली...

डोळ्याचं पातं लवतं न लवतं तोंच...

वरच्या माडीवरून अंगावर शहारे उत्पन्न करणारी एक दीर्घ किंचाळी ऐकूं आली नि तिच्या पाठोपाठ स्वैंपाकघरांतील भांडींकुंडीं कुणीतरी अस्ताव्यस्त फेंकून देत असल्यासारखा आवाज आला...

सगळ्यांचीं धाबीं अगदीं दणाणून गेलीं होतीं.

क्षणभरानं आणखी एक किंकाळी ऐकूं आली तशीं पंचाक्षरी मुकाट्यानं उठला नि म्हणाला, 'मी जातों. तुमच्या मुलीच्या रूपानं एक भूत तुमच्या घरांत वावरत होतं. मला पाहातांच तें पळून गेलं आहे. पण आजपासून तुमच्य घराला...'

तेवढ्यांत घरावरचीं दहा—बारा कौलं गडगडत खालीं आलीं.

सगळ्यांचीं डोकीं अगदीं सुन्न झालीं होतीं. हे सारे चमत्कारिक प्रकार एकामागून एक अशा कांहीं विलक्षण गतीनं घडले होते कीं त्यावर विचार करायला फारसा वेळच नव्हता कुणाला...

स्वयंपाकघरांतलीं भांडीं अस्ताव्यस्त उधळलीं होतीं. चिनी मातीच्या बरण्यांचा चक्काचूर झाला होता. मातीचीं भांडीं पुन्हां मातींत मिळालीं होतीं...

यानंतर महिनाभरानंतरची गोष्ट. अवसेच्या रात्रीं आबांच्या परसांतील पिंपळाकडून त्या दिवशीं ऐकूं आली होती तशीच एक किंकाळी ऐकूं आली.

ती ऐकतांच सगळ्यांनीं आपल्या घरांच्या दारं-खिडक्या पटापट बंद करून घेतल्या.

किंकाळी विरली तशी ती पिंपळावरची बाई मोठ्यांदा हंसली नि म्हणाली, 'शंभू...शंभू...शंभ्या...मी आक्का...अन्नपूर्णेच्या रूपानं पुन्हां आबांच्या घरांत आल्यें नि केलं कीं नाहीं अखेर तुझ्याशींच लग्न?...'

यानंतर आबा वालावलकरांचं घर हां हां म्हणतां उध्वस्त होऊं लागलं. वर्षाभराच्या अवधींत आबांसकट त्यांच्या घरांतलीं सात माणसं पटापट मेलीं.

शंभूनाना वर्षभर अंथरुणाला खिळून होते, पण अखेर एकदांचे ते कसेबसे उठले.

कित्येक वर्षे...कित्येक वर्षे खापड्यांच्या पंचक्रोशींत अक्काची ही कहाणी घुमत होती. ही कहाणी ऐकून भेदरलेलीं पोरं आपापल्या आयांना कवटाळीत होतीं.

आज या गोष्टीला पंचविसावर वर्षं होऊन गेलीं आहेत. आज अमावास्या. आज अक्काचा पिंपळावर यायचा दिवस. आज शंभूनानांनीं आपल्या बायकोला भेटायचा दिवस. म्हणूनच आज दुपारीं त्यांनीं गफूरकडून कोंबडं आणून ठेवलं आहे. आज तिन्ही सांजा उलटल्या कीं, दिवेलागणीच्या सुमारास शंभूनाना, आबा वालावलकरांच्या पडक्या घराच्या परसांतल्या त्या भयाण पिंपळाखालीं बसतील नि कुणाची तरी वाट पाहूं लागतील...

१९५०

* * *

: ११ :

# कचकडं

तुटलेल्या अंगठ्याची नि झिजलेल्या खोटांची चप्पल घातलेले श्री. रामचंद्र मार्तंडराव पलंगपोस उजवीकडच्या दाढेंत अडकलेलं लठ्ठ भाताचं शीत जिभेनं काढण्याची आटापीट करीत ऑफिसच्या पोर्चमध्यें शिरले, तेव्हां दहा वाजायला अजून तब्बल पंचवीस मिनिटांचा अवधि आहे हें आजूबाजूच्या कुठल्याहि घड्याळांत न पहातां त्यांना माहीत होतं. ऑफिसची वेळ साडेदहाची असूनसुद्धां नऊ–पस्तीसला ऑफिसचे जिने चढूं लागण्याचं ज्यांच्या पांचवीला पुजलेलं असतं, अशा मेंढरांच्या कळपाचे श्रीयुत पलंगपोस हे म्होरके होते. आयुष्याचीं गेलीं पंचवीस वर्षे अव्याहतपणें त्यांनीं आपल्या या उद्योगाशीं इमान राखलं होतं. गेल्या वीस वर्षांत एकदांहि 'कॅज्युअल लीव्ह' न घेणारा एक अजब प्राणी म्हणून त्यांच्यावरचे साहेब त्यांना ओळखत होते. वीस वर्षांच्या अवधींत या वातड कातडीच्या जनावराला चुकूनहि एकदां कसली रोगराई कशी झाली नाहीं याचं राहून राहून त्यांना आश्चर्य वाटत होतं. कधीं काळीं एखाद्या साहेबानं विचारलंच तर श्रीयुत पलंगपोस नव्यानंच बोहल्यावर चढणाऱ्या नवऱ्या मुलीसारखे लाजत नि हूँ हूँ करून हंसल्यासारखं करीत जे मुकाट्यानं बाहेर येत ते तडक आपली खुर्ची गांठून, घाण्याच्या बैलासारखे कामाला लागत...गेलीं पंचवीस वर्षे हें असं चाललं होतं. पंचवीस वर्षांपूर्वी जसं चाललं होतं तसंच आजहि चाललं होतं. पुढंहि श्रीयुत पलंगपोसांचा मुडदा जमीनदोस्त होईपर्यंत चालणार होतं.

असा हा पलंगपोस ऑफिसच्या पोर्चमध्यें आला तेव्हां मागं मागं रेंगाळूं पहाणाऱ्या घड्याळांच्या कांट्यांनीं आपली चूक सुधारून घेतली नि कांट्यांच्या बंधनांतून सुटून अंतराळांत सैराट भटकूं पहाणारं चुकार कालचक्र जागच्याजागीं आणून ठेवलं. साडेनऊ वाजून पांच मिनिटं झालीं. दहा वाजायला पंचवीस मिनिटं राहिलीं. मेंढरांचे कळप कोंडवाड्यांत यायला फक्त पंचावन मिनिटं उरलीं. इतक्यांत पलंगपोसाच्या मागच्या बाजूला कुठल्यातरी मोटारीचं हॉर्न जोरानं केंकाटलं. त्याचा आवाज पलंगपोसाच्या टोणग्या मेंदूपर्यंत पोंचायला थोडासा वेळ लागला. तरी एकदां तो तिथपर्यंत पोंचल्यावर पलंग-पोसानं जीव मुठींत धरून हातभर उडी मारायला कमी केलं नाहीं. तेवढ्यांत त्याच्या दाढेंत अडकलेलं लठ्ठ शीत फटींतून बाहेर आलं नि त्याच्या लाळघोट्या जिभेवर गडबडा लोळूं लागलं. पलंगपोसानं जिभेचं टोंक सर्पासारखं फिरवून त्या थट्टेखोर बदमाश शिताला पकडलं नि उजव्या दाढेखालीं रगडून त्याचा सत्यनाश करून टाकला.

इतक्यांत 'हॅलो पलंगपोस ऽऽ' अशी आपल्याला मागून कुणीतरी हांक मारीत आहे असं त्याला वाटलं, म्हणून मानेचा स्नायू पिळवटून त्यानं मागं पाहिलं तों...! अरे बापरे ऽऽ...चेस्टर्टनसाहेब ऽऽ...गुलाबी रंगाच्या आइस्फ्रूटसारखा दिसणारा...संबंध चेहऱ्यावर पांढरे पांढरे चट्टे उठलेला. यानंच काल पलंगपोसाला फैलावर घेतला होता. 'तूं शुद्ध दगडोबा आहेस!' असं खेंकसून खेंकसून त्याच्यावर ओरडला होता. 'माझ्या एक्सपेंडीचर सेक्शनमध्यें मला तुझ्यासारखे बफेलोज् नको आहेत. तूं उद्यांपासून स्टाफ सेक्शनमध्यें फाइलिंगच्या कामावर लाग!' असं सांगून त्यानं त्याला आपल्या केबिनच्या बाहेर हांकलला होता. हाच तो बदमाष माणूस! पण कसं का असेना, आपलं नांव तर याच्या लक्षांत राहिलं! लेकाचा काय गुर्मीत चालला आहे!...अन् साल्याचे बूटसुद्धां...तेवढ्यांत चेस्टर्टनसाहेब पलंगपोसाच्या अगदीं जवळ आला, तशी पलंगपोस एखाद्या विटाळशी बाईसारखा तीन पावलं मागें सरकला...कंबरेंतून काटकोनासारखा वांकला...अन् उजव्या हाताचीं तीन बोटं कपाळला लावून चेस्टर्टनसाहेबाच्या थोबाडाकडे पहात मिशा फेंदारून हंसूं लागला.

"यू आं टु गॉ टु स्टाफ्‌ सेक्शन्‌ टु डे ऽऽ" चेस्टर्टनसाहेब पलंग-पोसाचा मुजरा घेत घेत म्हणाला.

पलंगपोसानं पुन्हां एकदां दांत वेंगाडले नि थोडा वेळ नुसतंच ही ही ही करून तो म्हणाला, "ही ही...ही...ही...यस्‌ सर...ही ही ही ही".

'यू रिपोर्ट टु मिस्टर नांगामवॉला...आ हॅव टोल्ड हीम्‌...'

"यस्‌ सर...यस्‌ सर..." पुन्हां एकदां पलंगपोस कंबरेंतून वांकला. टॉक्‌ टॉक्‌ करीत चेस्टर्टनसाहेब जिना चढूं लागला नि पलंगपोस त्याच्यामागून लूत लागलेल्या कुत्र्यासारखा एखाद्या मुडद्याच्या पावलानं चालूं लागला. एक जिना चढून होतो न होतो तों त्याच्या फुफ्फुसांतील हवा संपली. ती पुन्हां भरून घेण्यासाठीं तो जिन्याच्या कठड्याला टेकून क्षणभर उभा राहिला नि श्वासोच्छ्वास करूं लागला.

थोडा वेळ जिन्याच्या कठड्याला टेकून दम खाल्ल्यावर तो दुसऱ्या जिन्याच्या पायऱ्या चढून वर आला नि एक्सपेंडिचर सेक्शनमधल्या आपल्या खुर्चीवर जाऊन क्षणभर कपाळाला दोन्ही हात टेकून बसला. थोड्या वेळानं त्याला आठवण झाली कीं...आपल्याला अजून अटेंडन्स रोलवर सही करायची आहे. बाबा, सगळं खरं. पण आल्यासारखी सही तर करायला हवी आधीं! समजा, ऑफीसांत येऊनसुद्धां अटेंडन्स रोलवर ही दोन अक्षरांची निशाणी करायची तशीच राहून मेलों तर आजच्या दिवसाचा तेवढा पगार नाहीं का फुकट जाणार?...मग त्यानं शाईच्चीं गर्द काळीं पुटं चढलेला होल्डर ड्रॉवरमधून काढला अन्‌ जिच्या तळाशीं चिखलाखेरीज कांहीं नसून केवळ वरवरच निळ्या-काळया शाईचे तवंग तरंगत होते अशा एका चिनी मातीच्या दौतींत तो बुडवून टेमगिऱ्याच्या टेबलावर तंगड्या पसरून बसलेला तो महाविख्यात विराट शक्तीचा अटेन्डन्स रोल गांठला. गेलीं वीस वर्षे तो या रोलवर सही करत होता तरी आपलं नांव नेमकं शोधून काढायला त्याला अजूनहि थोडा वेळ लागे. जेमतेम नांव हाताशीं लागलं कीं, तो तारखेचा कॉलम न्याहाळूं लागे. मग आपल्या नांवावर ठेवलेलं त्याचं बेढब बोट हळू हळू पुढं सरकून तारखेच्या कॉलमाजवळ येऊन थांबे. मग पलंगपोस महाशयांचा उजवा हात वर सटकूं लागे नि थोड्या

वेळानं आर. एम्. पी. हीं एकमेकांत गुंतलेलीं अक्षरं, पलंगपोस त्या दिवशीं ऑफिसांत जिवंत आला आहे याची ग्वाही देऊं लागत.

गेलीं वीस वर्षं तो करत आला होता तशीच सही त्यानं आजहि केली नि टेमगिऱ्याच्या टेबलावर पडलेल्या एका केसचीं पानं तो चाळूं लागला. जेकीन्ससाहेबाकडून टेमगिऱ्याला त्या केसवर मिळालेला जमालगोटा तो मिटक्या मारीत वाचूं लागला नि स्वतःशींच पुटपुटला, 'मी टोणगा काय? अन् भडव्या टेमगिऱ्या...ही तुझी दुथडी भरून वहाणारी अक्कल वाटतं! कसा काय वाटला जेकीन्ससाहेबानं दिलेला डूश्...हॅ हॅ...पलंगपोस म्हणे यमुनेंतला गोटा आहे. पण साल्या, हा पलंगपोस तुझं बारसं जेवला आहे बारसं.'

मग त्यानं टोपी काढून उजव्या मांडीवर जोरानं आपटली नि आपल्या टेबलावरच्या वेताच्या टोपलींत एका जाडजूड केसच्या खालीं दुमडून ठेवली. मग त्यानं धोतराच्या सोग्याचा गोळा केला नि थुंकीनं ओल्या झालेल्या मिशांवरून फिरवला. मग त्यानं टेबलाच्या फटींत पडलेल्या टांचण्यांतली एक टांचणी उचलली नि दांत कोरीत, तुळईवर बसून घुमणाऱ्या कबुतरांच्या जोडप्यांचा रोमान्स तो न्याहाळून पाहूं लागला. मध्येंच एक पीस अलगद हिंदकळत खालीं आलं नि पलंगपोसाच्या अंगावर पडलं. त्यानं तें चिमटींत धरलं नि फुंक मारून पुन्हां वर उडवलं. या सगळ्या प्रकाराची त्याला एकंदरींत गम्मत वाटली नि नोकरीचाकरी सोडून नुसतं कबुतरांचा रोमान्सच पहात बसावं...नुसतं पिसंच उडवीत बसावं, असा कांहींसा गंमतीदार विचार त्याच्या मनाला चाटून गेला. मध्येंच तो स्वतःशीं खुदकन् हंसला नि आपल्याशींच लाजला...

इतक्यांत त्याला आठवण झाली कीं आजपासून आपल्याला स्टाफ सेक्शनमध्यें हांकलण्यांत आलं आहे. पंचवीस वर्षांची नोकरी करूनहि आपल्याला कांहीं येत नाहीं असा या लोकांचा दावा आहे. हो बाबा, मला कांहीं येत नाहीं. मी तुमच्यासारखं मोठं फर्डं लिहूं शकत नाहीं. मीं मारलेल्या बेरजा बहुधा चुकलेल्याच असतात. पण या हरामखोर टेमगिऱ्याला चहाड्या करायला सांगितलं आहे कुणीं?...का या लोकांना अधूनमधून आपलीं घाणीनं भरलेलीं थोबाडं उघडल्याशिवाय रहावतच नाहीं!

शिंच्या...तुझं अशानं कधींच कल्याण व्हायचं नाहीं. नाहीं रे नाहीं.

आज तूं जे अडीचशें रुपये खातो आहेस ते खरेखुरे या पलंगपोसाचे आहेत. पण बेट्या या पलंगपोसाला छक्केपंजे खेळतां येत नव्हतं म्हणून तुला...उलट्या काळजाच्या एका बेमुर्वत गाढवाला, अशिस्टंटाची ग्रेड खायला मिळाली आहे. टेमगिऱ्या, माझे तळतळाट घेतो आहेस. पण तुझं तेरावं जेवीन, तेव्हांच हा पलंगपोस मरेल एवढं बाकी लक्षांत ठेव. आजपासून माझी स्टाफ सेक्शनला बदली झाली आहे. नशिबांत असलं तर तुझ्याहि पुढं जाईन. नाहीं तर अर्धी लाकडं आधीं रवाना केलेलींच आहेत...पलंगपोस आंतल्या आंत नुसता तापला होता. त्याच्या तुळतुळीत डोक्यावर एखादं अंडं फोडून थापलं असतं तर पांच मिनिटांत एक फर्मास आम्लेट तयार झालं असतं. त्याच्या मस्तकांतल्या घवघवीत शिरा तडातड उडूं लागल्या होत्या. डोळ्यांच्या खोबणींत कढत हवा जाऊन बसली होती...

तेवढ्यांतच मोठ्यानं ढेकर देत देत शिवेश्वरकर सेक्शनमध्यें आले नि आपल्या हातांतली गोणपाटाची भली मोठी पिशवी घडी करून ड्रॉवरमध्यें टाकतां टाकतांच पलंगपोसाकडे वळून गरजले, "आजपासून तुम्हीं चाललांत असं ऐकतों."

"होय. चाललों. टेमगिऱ्याला म्हणावं, आतां स्वस्थ चित्तानं प्राण सोड."

"काल चेस्टर्टनसाहेबानं बोलावलं होतं वाटतं तुम्हांला ?"

"हं..." अन् मग सगळं पुराण सुरू झालं. बोलतां बोलतां शिवेश्वर-करांनीं तपकिरीची बाटली काढली नि पलंगपोसाच्या स्वाधीन केली. पलंगपोसानं गुंजभर तपकीर चिमटींत धरली नि नाकाच्या खबदाडांत कोंबून तो हा...ची... हा...ची करून शिंकूं लागला. एक...दोन...तीन...चार...पांच मग त्याला थोडंसं बरं बाटलं. डोळे ताणून त्यानं उगीचच आजूबाजूला नजर भिरकावल्या-सारखं केलं नि धोतराच्या सोग्यानं नाक साफ करायला सुरुवात केली. तेवढ्यांत सेल्स सेक्शनमधले हिंवाळे तिथं आले. त्यांनीं आपल्या कोटाच्या खिशांत कोपऱ्यांत लपून बसलेलीं सुपारीचीं खांडं त्या दोघांच्या हातावर ठेवलीं नि माणुस-कींतून उठलेल्या त्या तीन लंबकर्णांच्या गप्पांना हळू हळू रंग भरूं लागला... मग गोवर्धन शेट आले...अन् दफ्तरी आला...बरोबर दहा–पस्तीसला टेमगिरे आला नि मुकाट्यानं आपल्या खुर्चीवर जाऊन बसला. तेवढ्यांत जी. के. पी. टी.

शुभाशुभानुजम् साहेब टॉक टॉक करीत आले नि तडक आपल्या सुपरिंटेंडंटच्या जाग्यावर जाऊन बसले. मग पलंगपोसाच्या भंवतालची गर्दी हळू हळू पांगूं लागली...

थोड्या वेळानं पलंगपोस आपल्या खुर्चीवरून उठला नि अंग चोरीत सुपरिंटेंडंटसाहेबाच्या पुढ्यांत जाऊन उभा राहिला.

सुपरिंटेंडंट साहेबांनीं पानाचा तोबरा भरला होता. कपाळाला भस्म फासलं होतं. कसल्यातरी घाणेरड्या रंगांचा चुरगटलेला टाय गळ्याभोंवतीं गुंडाळला होता. ' ऊं... ऊं... ऊं...' करून त्यांनीं पलंगपोसाकडे पाहिलं नि तोंडांत जमलेली थुंकी गिळून झाल्यावर विचारलं, ' यू आरर् टु गो ओ ओ ऽ ऽ... टु डे ऽ ऽ मिस्टर पलंगपोस्स... "

" यस् सर...ही ही ही... "

" सो यू क्यॅन् रिपोर्ट टु मिस्टर नायगामवाला... अँ ? "

" ऑल राईट सर... " मग तो जायला निघाला.

शुभाशुभानुजम्ला त्यानं सलाम ठोकला नि त्यानं पाठ फिरवली. इतक्यांत त्याला आठवण झाली कीं, आपण आणखी कांहीं तरी म्हणणार होतों... हं...मग तो तसाच गर्रकन् वळला नि ही ही ही करत पुन्हां त्याच्या पुढ्यांत उभा राहिला.

" यस् ऽऽऽ ? " त्या मद्राशानं भुंवया वर चढवल्या.

" ही ही...प्लीज रिमेंबर मी...आय थिंक सॅड टु लीव्ह यू... "

" दॅटस् ऑल राईट...यू क्यॅन् गोऽऽ " अन् मग मुकाट्यानं तो आपल्या टेबलापाशीं येऊन सुन्न मनानं इतस्ततः पसरलेल्या कागदांच्या चिटोऱ्यांकडे पहात उभा राहिला. ज्या टेबलावर त्यानं अव्याहतपणं पंधरा वर्षं काम केलं होतं तें हें टेबल...पंधरा वर्षं एकाच बाईबरोबर नांदल्यानंतर तिला सोडून जाण्याची पाळी यावी तसं त्याला वाटत होतं. छातींतले फुफ्फुसाचे गोळे ताठरले होते. पोटांतलीं आंतडीं हिंवतापाच्या रोग्यासारखीं थरथरत होतीं. आंतल्या आंत...आंतल्या आंत कुठंतरी रडूं फुटूं पहात होतं. ही क्रॉफर्ड ब्रॅकलेची केस...तीं छोटूलाल दयारामचीं व्हाऊचर्स. हीं

डायरेक्टर बोर्डाला जायचीं स्टेटमेंटस्...हरे रामा...हरे रामा...या प्याऱ्या दोस्तांना सोडून मी इथनं कसा जाऊं हो ! लोक एक टेबल सोडून दुसऱ्या टेबलावर जातात तेव्हां पांचदहा रुपयांची मोटली तरी त्यांच्या कनवटीला येऊन बसते. अन् आपण या टेबलाचा निरोप घेतों आहोंत तों तो निरोप घ्यायचा चेस्टर्टनसाहेबाचा हुकूम आहे म्हणून...हा शुभाशुभानुजम् म्हणतो, तूं दगडोबा आहेस. तुला धड एखादं वाक्य लिहितां येत नाहीं. आकड्यांचा नि तुझा छत्तीसाचा आंकडा. अकलेचं तुला वावडं. पर्सनॅलिटीच्या नांवानें बोंबा... शंखध्वनि...काय बघून कंपनीनं तुझ्यासारखा पोळ पोसायचा...? हा भडवा टेमगिऱ्या...साला हरामखोर...चहाड्या करून पोटाची खळगी भरणारा निमकहराम...याचंच...याचंच असलं पाहिजे हें काम ! पण लोकाचा स्वस्थ बसला असता तर काय मेला असता !...दगडोबा...दगडोबा...दगडोबा...मी दगडोबा, मला कांहीं येत नाहीं...!...मला काडीचीहि अक्कल नाहीं...!...

इतक्यांत शिवेश्वरकर मागून ओरडले, “ काय, मग मिळाली का ऑर्डर जायची ? ” एकदम तो भानावर आला नि क्षणभर घुटमळल्यासारखं करून म्हणाला, “ अं...? काय...? ऑर्डर...? यस...आय गॉट इट. ”

आपोआप त्याचे हात टोपलींतल्या त्या जाडजूड केसच्या खालीं गेले नि एक घामटलेली टोपी घेऊन अलगद बाहेर आले. आपोआप ती टोपी पलंग-पोसाच्या उजव्या मांडीवर आपटली गेली नि हळूच त्याच्या डोक्यावर जाऊन बसली. मग अलगद शाईनं बरबटलेला निळ्या शाईचा टाक फताड्या निफाचा तांबड्या शाईचा टाक...एक करंगळी एवढी पिवळ्या कातडीची पेन्सिल... एक जुनाट बोथटलेला खोडरबर पलंगपोसानें आपल्या कोटाच्या खिशांत कोंबला नि आपल्या शेजारच्या खुर्चीवर काम करणाऱ्या मकसूद अली शेखकडे वळून म्हणाला, “ मिस्टर शेख, हम थोड्या वेळानं आउंगा...से बाय इव्हनिंग... और ड्रावरमधलं सब सामान लेकर जाऊंगा...तोंपर्यंत असनादेव इधर...अं ? ”

मग पुन्हां त्यानं हाशहुश केलं. कांहीं केल्या त्याला त्या टेबलाचा मोह सोडवत नव्हता.

पण अखेर नाईलाजानं त्याला पाय उचलावे लागलेच. शिवेश्वरकरांची नि त्याची नजरानजर झाली. तेवढ्यांत सुपरिंटेंडंट शुभाशुभानुजमनं त्याच्याकडे रान-

डुकरासारखे डोळे फाडून पाहिलं. पण त्यांतल्या त्यांत संधि साधून तो खालीं मुंडी घालून काम करीत असलेल्या टेमिगऱ्याकडे गेला नि त्याच्या कानाला तोंड लावून कुजबुजला, 'टेमगिऱ्या...या सेक्शनमधून पलंगपोस चालला—आतां निर्धास्तपणें तुला वावरायला हरकत नाहीं.' कागदाच्या ढिगाऱ्यांत मुंडकं खुपसून बसलेल्या टेमगिऱ्याची वर मान करून बघायला हिंमत झाली नाहीं. त्यानं तेवढ्यांतल्या तेवढ्यांत आंग चोरलं. बसल्या बसल्याच चुळबुळ चुळबुळ केली. टेबलाच्या पायथ्यास पडलेलं पस्तीस हंड्रेडवेट वजनाचं एक जाडजूड रजिस्टर उचलतां उचलतां कुंथून नि पुन्हां मुंडी खालीं करून तो कामाला लागला. शिवेश्वरकर पलंगपोसाकडे एकवार नजर भिरकावून गालांतल्या गालांत हंसला नि पलंगपोसाला त्यांनीं डोळा मारला.

"ऐकलंस काय टेमगिऱ्या...मी चाललों. आतां मनमोकळेपणानं चर. कुरण तुला मोकळं होतंच आधीं. पण आतां तें तुझ्या मालकीचं झालं आहे." अन् मग तो स्वतःशींच एखाद्या खुनी माणसासारखा हंसला.

इतक्यांत सुपरिंटेंडाच्या टेबलावरून डुरकावणी ऐकूं आली. "मिस्टर पलंग ऽ ऽ पोस्स—हॅव् यू रिपोर्टेड इन् स्टाफ् सेक्शन?"

यावर पलंगपोस पळपुट्या कुत्र्यासारखा भुंकूं लागला.

"नो सर...यस्...आय यम् गोअिंग देअर ओन्ली..."

"देनू व्हाय आर यू स्टॉपींग हिअर?"

"नथींग सर—ही ही...आय यम् गोइंग जस् नाऊ!—"

मग तो हळूचकन् एक्सपेंडिचर सेक्शनच्या बाहेर पडला नि स्टाफ सेक्शनच्या दिशेनं भराभर पावलं टाकूं लागला...

स्टाफ सेक्शनमध्यें शिरतांच त्याला चीफ् क्लार्कसाहेब नायगांववाला कुणाच्या तरी पूर्वजांची ब्रोडपट्टी करीत असलेले दिसले. तें अजब दृश्य पहातांच पलंगपोसाला वांद्याच्या खाटिकखान्याची आठवण झाली नाहीं. उलट अशीं दृश्यं पाहिलीं म्हणजे त्याला ऑफिसांत असल्यासारखं वाटत असे. अरे, शिव्या खात नाहीं...भजीं खात नाहीं...पैसे खात नाहीं...अधूनमधून दांतओंठ खात नाहीं, तो कारकून कसला?—अन् जो कारकून नाहीं तो माणूस तरी कसला?...

दबकत दबकत तो नायगांववाल्याच्या टेबलाजवळ जाऊन उभा राहिला.

" यस् ऽऽऽ ? " नायगांववाला वस्कन् त्याच्या अंगावर आला. तरीहि पलंगपोसाला त्याची भीति वाटली नाहीं.

" ही ही ही...आय यम् मिस्टर पलंगपोस..."

" सो व्हॉट ? "

" नथिंग सर..."

" देन व्हाय हॅव यू कम् हिअर ? "

" नो व्हाय सर...आय यम् ट्रॅन्स्फर्ड टु धिस सेक्शन..."

" हां हां हां हां ऽ ऽ ऽ...म्हंजी तू ते एक्स्पेंडचीर शिक्षणवाला...हां–मला चेस्टर्टनसाब उद्या बोलला हता...सो यू कॅन् टेक यूर सीट इन् दॅट कोर्नर...फायालिंगवर काम करायला पडल. "

...अन् मग ती कोपऱ्यांतली खुर्ची...ढेंकणांनीं तुडुंब भरलेली...तें टेबल...एखाद्या प्रेतासारखं दिसणारं...

त्या दिवशीं पलंगपोसानं दुपारीं तीन वाजेपर्यंत कामाला हात लावला नाहीं. नायगांववाल्यानं तेवढ्यांतल्या तेवढ्यांत पलंगपोसाची लायकी जोखली नि त्याला जवळ बोलावून पांचदहा मिनिटं नुसता छेडला. पलंगपोसहि अधून-मधून त्याच्या म्हणण्याला दुजोरा देण्यासाठीं मानेला स्क्रू बसवलेल्या कच-कड्याच्या बाहुलीसारखा मान हालवीत होता.

मग त्यानं आपल्या ड्रॉवरमधून एक छोटीशी चकचकीत चावी काढून पलंगपोसच्या हातावर ठेवली नि म्हटलं, ' त्ये बाहेरच्या कपाटमंदी एक्षपेंडीचर शिक्षणचे फाईल हाय तेतली मिस्टर जी. वाय. ढुकरघुशेची फाईल घेऊन-शानी ये. '

पलंगपोसानं त्याच्या हातांतली चावी घेतली नि टुणूदिशीं उडी मारून तो बाहेरच्या कपाटाशीं आला. कपाट उघडतांच एक उंदीर सरसरत त्याच्या पायावरून गेला नि जुन्या कागदपत्रांचा कुबट वास त्याच्या नाकांत शिरला.

दोनचार सेक्शन्सच्या फायलींचे ढिगारे कपाटांतून ओढून खालीं टाकण्याच्या खटाटोपांत पलंगपोसाच्या गोणपाटी कोटावर अर्धा इंची जाडीचा धुळीचा थर

बसला. अखेर एक्सपेंडिचर सेक्शनची फाईल एकदांची त्याच्या हाताला लागली. आजूबाजूला कुणी नाहीं याची खात्री करून घेतल्यानंतर त्यानं घाईघाईनं त्या फायली ज्याच्यांत बांधलेल्या होत्या त्या पॅडची दोरी सोडायला सुरवात केली. पलंगपोसाच्या त्या गोंधळांत ती गांठ इतकी घट्ट बसली कीं, पलंगपोसाच्या डाव्या हाताच्या अंगठ्याचं नख जर वाढलेलं नसतं तर त्याला ती दोरी कापूनच काढावी लागली असती...

शेवटीं एकदाचं तें पॅड उघडलं नि एक्स्पेंडिचर सेक्शनमधल्या लोकांच्या पर्सनल फायलीचा ढीगच्या ढीग पलंगपोसाच्या पुढ्यांत विखुरला गेला. पलंगपोसाला वाटलं, अलिबाबानें तिळा उघडली आहे. त्यानं आपले जाडजूड कातडीचे खडबडीत हात जोरानं एकमेकांवर आपटून धूळ झाडल्याचं सोंग केलं नि अर्धा फूट लांबीची एक दीर्घ जांभई देऊन तो आपल्या भाईबंदांचीं आयुष्यं चाळूं लागला. गेल्या पंचवीस वर्षांत ज्याचं कधीं त्यानं तोंड पाहिलं नव्हतं तो पर्सनल फायलींचा खजिना त्याच्या समोर उघळून पडला होता. ज्यांच्याबरोबर त्यानं वर्षानुवर्षं कामं केलीं... ज्यांचे हेवेदावे केले, त्या एक्स्पेंडिचर सेक्शनमधील त्यांच्या दोस्तांचीं, शत्रूंचीं ऑफिसांतील कुलंगडीं आज एकाएकीं त्याच्या हातांत आलीं होतीं. हा सी. एम्. रहाटगाडगे–हा आर्. पी. घुबडे, हा सी. आर्. नायर हा जॉली बम्मनजी...अन् हा तो भडवा...हरामखोर...वहाव्वारे वहाव्वा... म्हणे गजानन मल्हार टेमगिरे...अन् मग पलंगपोसानं टेमगिऱ्याची फाईल उघडून एकएक पान चाळायला सुरवात केली. टेमगिरे नोकरीला लागल्या-पासून तो पलंगपोसाला टांग मारून पंच्याऐशीं...एकशे पंचविसांत जाईपर्यंतचीं सारीं कागदपत्रं त्यानं आपल्या नजरेखालून घातलीं...

हा तात्या उमरखाडे...हा मियां गुलाम कादर...अन् हे...हे शेट... रामचंद्र मार्तंडराव पलंगपोस...

आजूबाजूला कुणी नाहीं याची चाहूल त्यानं घेतली. हातभर लांब जीभ बाहेर काढून एकदां आपल्या फेंदारलेल्या मिशांवरून फिरवली नि नोक-रीच्या घाण्याला लागल्यापासूनच्या आपल्या आयुष्याचीं...ऑफीशियल करियरचीं पानं तो चाळूं लागला. आयुष्याचीं पानं...आयुष्य हा जणुं एक वृक्ष अन् इथं या

दगडी इमारतींत आपल्याला मिळणाऱ्या शिव्या, लोकांना मिळणारीं प्रमोशनं, हीं त्याचीं पानं...आयुष्याचीं पानं...उंदरांनीं कुरतडलेलीं...झुरळांच्या लेंड्यांनीं बरबटलेलीं...फिनेलच्या गोळ्यांचा वास येणारीं. मध्येंच तो स्वतःशीं हंसला नि डोळे किलकिले करून आपल्या पर्सनल फायलीच्या तळाशींच असलेला आपला अर्ज वाचूं लागला. हा अर्ज पंचवीस वर्षांपूर्वी त्यानं खरडला होता. कुणी तरी शेजारच्या गृहस्थानं लिहून दिला होता अन् यानं डोळे तिरळे करून...जीभ बाहेर काढून...मानेच्या घड्या मोडून तो नव्या नवरीच्या डौलांत कॉपी केला होता. एकदां, दोनदां–तीनदां त्यानं तो अर्ज वाचला. त्याच्यावरची शाई थोडीशी फिकट झाली होती. बाजूच्याच मार्जिनांत कुणाचे तरी गिचमिड अक्षरांत खरडलेले शेरे होते. त्यानं इकडचे तिकडचे आणखी कांहीं कागद चाळले नि पुन्हां तो आपल्या भीकमाग्या अर्जावर येऊन ठेपला...हँ हँ...म्हणे, आय बेग टु अप्लाय युवर काईंड ऑनर...युवर मोस्ट ओबीडिअंट सर्व्हंट अन् खालीं ती सही!...रामचंद्र मार्तंडराव पलंगपोस...कां कुणास ठाऊक, मध्येंच तो एकाएकी थांबला नि हाताचीं बोटं मोडून कसलातरी हिशेब करूं लागला... बराच वेळ तो हा हिशेब उलटसुलट करून पहात होता. मध्येंच त्यानं भुंवयां-वर सांचलेला घाम हाताच्या अंगठ्यानं निथळून टाकला नि आपल्याशींच खुदकन् कुजबुजला, 'फॉर्टी फाईव–पंचेचाळीस एक्झॅक्टली पंचेचाळीस...'

इतक्यांत नायगांववाल्यानं त्याच्या पाठीवर पाठवलेला नंगप्पा सकाराम प्यून तिथं आला नि ततपप करीत पलंगपोसाला विचारूं लागला, "सायबांनीं विचारलं हाये, फाईल मिळाली कीं नाय?" एका क्षणांत पलंगपोसाची धुंदी उतरली नि तो ताळ्यावर आला.

"अँ?...ऊं?...अँ?...अरे, गेला उडत..." मध्येंच त्यानं जीभ चावली नि डोळे विस्फारून तो नंगप्पाकडे पहात म्हणाला, "गेली उडत फाईल...मिस्टर डुक्करघुशाचीं हीं नेहमींचींच लफडीं आहेत. आज मला इंक्रीमेंटच मिळालं नाहीं. उद्यां काय पगारांत साडेबारा आण्याची चूकच झाली आहे...!" बऱ्याच उशीरानं असलं तरी बऱ्याच लौकर त्याच्या लक्षांत आलं होतं कीं नंगप्पा हा नायगांववाल्याच्या खांकेंतला बाल आहे. मग नंदीबैलासारखी खालीं मुंडी घालून तो समोरचा

फायलींचा ढीग उपसूं लागला...टी. आर. शेंबवणे...सी. जी. बाशिंगे... चम्मनजी बम्मनजी कांचेचीबाटलीवाला...अबू बकर करीम हुसेन...सी. आर्. एम्. टी. गुडगुडगुंडम्...शंखदगड...धोंडे...रेती...वाळू...चुना...मुरुम... चिखल...नि...नि डुक्करघुशे... काय साल्यांचीं नांवं तरी...! यांचा उच्चार तरी कुणी करायचा नि कसा करायचा? काय यांच्या बापजाद्यांचे नोकर आहोंत आम्हीं...?"...

मग त्यानं डुक्करघुशाची फाईल बगलेंत मारली...फाईलींचा तो ढीग कपाटांत ठेवायला नंगाप्पाला फर्मावलं नि बगलेंतली ती फाईल नायगांववाल्याच्या कपाळावर मारल्यानंतर तो आपल्या जागेवर येऊन पुन्हां मघांचाच हिशेब करीत बसला. आजूबाजूनीं माणसं मोजून त्यांच्या संख्येंत आणखी कांहीं बोटांची भर टाकली नि त्यांच्या संख्येला कशानं तरी गुणून तो पेन्सिल चावीत आणखी विचार करूं लागला...एक आणा तो...ते दोन आणे...तीन आणे...म्हणजे पंचवीस इंटु तीन...तीना पांचे पंधरा...हातचा आला एक...अरे, एवढं कशाला? पंचवीस त्रिक पंच्याहत्तर...चार रुपये अकरा आणे...

पुन्हां तो आपल्याशींच गालांतल्या गालांत हंसला नि हातांतली कॉपिंग पेन्सिल चोखीत खालच्या मारवाड्याकडे जाऊन म्हणाला, "भटा... पंचवीस सिंगल चहा नि दोन दोन आण्याच्या शेवगांठ्याच्या पंचवीस पुड्या ताबडतोब वर पाठवून दे...पैसे पगाराला. नांव ठाऊक आहे कीं नाहीं माझं?—पलंगपोस...आर्. एम्. पलंगपोस..."

थोड्या वेळानं चहाचे कळकट कप घेऊन मारवाड्याचा पोरगा वर आला. पलंगपोसानं एकेकाच्या टेबलावर एकेक पुडी नेऊन ठेवली. प्रत्येकाच्या समोर दांत वेंगाडले. मान मुरकली. एखाद्या खाजगी बैठकींत गाणाऱ्या नायकिणीसारखे नखरे केले नि म्हटलं, "नथिंग...नथिंग...तसं कांहीं नाहीं. आज वाटलं, आपल्या दोस्तांना चहा द्यावा. दॅटसॉल..." नायगांववालाहि त्याच्याकडे पाहून मिस्कील हंसला.

मग तीन पुड्या घेऊन तो आपल्या जुन्या सेक्शनमध्यें आला. एक पुडी शुभाशुभानुजम्...एक शिवेश्वरकर...अन् एक तो भडवा—निमकहराम टेमगिऱ्या...

नेहमींप्रमाणें टेमगिरे कागदांत डोकं खुपसून बसला होता.

" टेमगिऱ्या...हा चहा घे...अन् या शेवगांठ्या...खा, पी, मजा कर. यांचे पैसे मी देणार आहें. अजिबात काळजी करूं नकोस. अरे, आपलीं कचकड्याचीं आयुष्यं. कसले या पलंगपोसाचे हेवेदावे करतोस ?...ज्यांच्याशीं झुंज द्यायची त्यांना टक्कर मारून पहावी. उगीच आपलं दिसला दगड कीं तंगडी वर करण्यांत काय अर्थ आहे ? "

या खेपेलाहि वर मान करून पहाण्याची टेमगिऱ्याची छाती झाली नाहीं.

" अरे, विस्तवावर धरलीं तर भुर्कन् जळून जातील. पहिल्यानं थोडीशी घाण येईल नि मग थांगपत्तासुद्धां लागायचा नाहीं ! "

बोलतां बोलतां पलंगपोसानं शिवेश्वरकरांकडे नजर फेंकली नि गाठ्यांच्या पिठाचा लाळेंत मळलेला मलिदा गिळतां गिळतां शिवेश्वरकरांनीं त्याला डोळा घालून विचारलं,

" कसला चहा ? "

" माझ्या मानेवर बसलेलं टेमगिऱ्याचं भूत उतरलं म्हणून ! " शिवेश्वरकरांनीं एवढं जाणलं कीं, आजच्या चहाचं कारण दुसरंच दिसत आहे. पण ते कांहीं बोलले नाहींत.

...संध्याकाळ. ऑफिस सुटतां सुटतां पलंगपोसानं शेजारच्या शंखपाळ्याकडून पांच रुपये उसने घेतले नि मोठमोठे ढेकर काढीत तो ऑफिसच्या बाहेर पडला.

खालीं आल्यावर त्यानं दोन दिडक्यांचे चणे घेतले नि आपल्या कोटाच्या दीडखणी खिशांत चोंदून ठेवले.

गिरगांवांत त्यानं दोन आण्यांचं उद्‌बत्त्यांचं बंडल घेतलं. कांदेवाडी जवळच्या भय्याकडून दीड रत्तल जिलब्या घेतल्या. वाटेंत दोन आण्यांचे पिपाणीवाले फुगे घेतले नि तो घरीं आला.

बायकोनं विचारलं, " पुडी कसली ? "

" जिलब्यांची. "

" जिलब्यांची ? आतां मध्येंच कशाला ? "

" कशाला म्हणजे ? खायला. अग, आपलीं आयुष्यं हीं एवढींएवढीं. फुंक मारली तर उडून जाणारीं. "

" म्हणजे ? " त्या बिचारीच्या मनांत भलभलतेच विचार येऊं लागले. रोज ऑफिसांतनं आल्याबरोबर घुम्यासारखा बसणारा आपला नवरा आज असं कांहींच्याबाहींच बरळायला लागलेला पाहून ती मनांतल्या मनांत थोडीशी दचकलीच.

" म्हणजे कांहीं नाहीं. आमच्या ऑफिसांतला एक जण आज अमदाबादहून आला. त्यानं आणल्या या माझ्यासाठीं ! "

" अन् या उदबत्त्या कशाला ? "

" कशाला नाहीं. दोन आण्यांना पन्नासांचं बंडल कधीं नव्हतं तें मिळालं. म्हटलं, एक घेऊन तर पाहूं. "

उदबत्त्या, जिलब्या घरांत येण्याचं कांहीं कारण असलंच, तर आपला नवरा सांगतो आहे तें खास नव्हे, हें त्याच्या बायकोला उमगलं नव्हतं असं नाहीं. कसं झालं तरी पलंगपोस नांवाच्या कारकुनाबरोबर बावीस तेवीस वर्षे नांदलेली स्त्री होती ती ! पण अधिक कांहींच न बोलतां ती मुकाट्यानं आपल्या कामाला लागली.

त्या दिवशीं पंलगपोस आपल्या पोरांबरोबर चिक्कार हुंदडला. शेजाऱ्याशीं पोट भरून बोलला नि घरीं येऊन मरेपर्यंत जेवला. पलंगपोसाच्या वर्तणुकींत एकाएकी पडलेला हा फरक पाहून शेजाऱ्यापाजाऱ्यांना सायक्लोनची आठवण झाली नि आश्चर्यानं तोंडांत बोट घालून ते आपापल्या बायकांकडे आ वासून पाहूं लागले. पलंगपोसाचीं पोरंहि चाट झालीं.

जेवतांना पलंगपोसानं मोठ्या मुलाला उदबत्त्या लावायला सांगितल्या. रोज जेमतेम चारपांच उंड्या कशाबशा जेवणाऱ्या पलंगपोसानं आज तीनदां भाताची मागणी केली. दहा–बारा जिलब्या खपवल्या. त्यांच्या पोकळींत सांठलेलं तेलकट तूप, अगर तुपकट तेल, मटनाच्या नळीसारखं चोखून चोखून खाल्लं नि दीड लोट्या पाणी ढोंसलं.

जेवणानंतर मुलाला खालीं पाठवून त्यानं तीन पानपट्ट्या आणवल्या. त्यांतली एक आपण खाल्ली. एक बायकोला ठेवली अन् एक तीन पोरांमध्यें वांटून दिली.

पलंगपोसाची बायको आपल्या यजमानांचे हे चाळे पहात होती. पण पाहून न पाह्यल्यासारखं करीत होती.

हळूहळू रात्र डोक्यावर चढूं लागली. जिलबीच्या जेवणानं सुस्तावलेल्या पोरांचे डोळे पेंगू लागले. पाळण्यातलं पोर झोंपेंतल्या झोंपेंत हंसूं लागलं.

पलंगपोसानं दबकत दबकत आजूबाजूची चाहूल घेतली नि तो पाळण्या-जवळ येऊन उभा राहिला. पाळण्यांतले सहा महिने वयाचे ज्यूनिअर पलंगपोस जागे झाले होते नि आपल्या पायाचे अंगठे चोखीत होते. पलंगपोसानं त्याचे गालगुचे घेतले. त्याला धरून गदगदा हलविलं. पटापट पटापट त्याचे मुके घेतले. त्याला गुदगुदल्या केल्या. त्याला जीभ काढून वांकोल्या केल्या. नि पाळण्यांतून त्याला काढून त्याला उंच झोंकावत झोंकावत तो नाचूं लागला. कोटाच्या खिशांतला पिपाणीचा फुगा काढून त्याला वाजवून दाखवूं लागला. संशयकल्लोळांतलं कुठलं तरी गाणं गुणगुणूं लागला....

त्याच्या या गडबडीनं झोंपलेलीं पोरं जागीं झालीं नि आपल्या बापाचे प्रताप पाहून पांघरुणांतल्या पांघरुणांत हंसूं लागलीं.

पलंगपोस नुसता बेहोष झाला होता. लाखों विश्वांच्या साम्राज्यांचीं साम्राज्यं तुडवीत सैराट धांवत सुटला होता.

थोड्या वेळांत तो दमला, तरीं हातांतल्या त्या पोरासकट आपल्या अंथरुणावर कोसळला. मग त्यानं आपले दोन्ही पाय वर केले. त्याच्यावर तो सहा महिने वयाचा मांसाचा गोळा ठेवला नि ती कसरत करतां करतां त्याला म्हणाला, " लाजा...माजा आज वाढदिवस आहे...हो ऽऽऽ माझा... वाढदिवस...आपण तुझाहि करूं हं ! पण आज माझा आहे...मला पंचे-चाळिसावं वर्ष लागलं...हो ऽऽऽ...अजूनपर्यंत मला हें माहीत नव्हतं. आज मी माझी जन्मतारीख पाहिली...आज...नि आजच मला पंचेचाळिसावं वर्ष लागलं... "

मग त्यानं पुन्हां तो पिपाणीचा फुगा वाजवायला सुरुवात केली. आपली बायको स्वयंपाकघरांत गेल्याला बराच अवधि लोटून गेला आहे याची बापड्याला दादहि नव्हती. त्यानं पुन्हां एकदां फुग्यांत हवा भरली नि पिपाणी-वरचं बोट अलगद सोडून दिलं...पँ...पाँऽऽऽऽऽ

इतक्यांत त्याची बायको स्वयंपाकघरांतून ओरडली, "काय मांडलंय् काय तुम्हीं आज हें ? लोक झोंपलेयत् निपलेयत् कांहीं आहे कीं नाहीं ?..."

मग त्यानं हळूंच जीभ बाहेर काढली नि तो स्वतःशींच लाजला.

"नाहीं ग...तूं गेलीस तेव्हां झोपेंतून उठून यानं भोकांड पसरलं. कांहीं केल्या उगीच राहीना. अखेर फुग्याचं अस्त्र सोडावं लागलं...आज माझा वाढदिवस..."

अन् कां कुणास ठाऊक, एकदम त्यानं पुढचे शब्द गिळले.

१९५१

* * *

: १२ :

# पाषाण

खोलींत अजस्र अजगरासारख्या पसरलेल्या सुस्त अंधाराला भुरकट जांभळा रंग चढूं लागला होता...अंथरुणांत पडल्यापडल्या त्यानं जडावलेले डोळे उघडून आजूबाजूला पहाण्याचा प्रयत्न केला, तेव्हां निमिषार्धापूर्वीं त्याच्या डोळ्यांच्या पापण्यांना फुंकर मारणारीं लडिवाळ स्वप्नं, त्या अंधारांत पाहतांपाहतां वितळून गेलीं नि त्यांच्या जागीं निळ्यातांबड्या ठिपक्यांचीं भेसूर पांखरं फडफड करूं लागलीं. डोळे उघडतांच कसला तरी प्रकाश लखकन् फांकला नि मग हळू हळू मांजराच्या पावलांनीं भुरकट जांभळा अंधार पसरूं लागला. नजरेवर कसलींतरी अभ्रं चढलीं होतीं तीं अलगद उडून गेलीं नि आंसवांनीं डबडबलेल्या डोळ्यांना भंवतालचा प्रदेश दिसतो तशा आजूबाजूच्या वस्तु दिसूं लागल्या. पहिल्यांदा त्याला जाग आली तेव्हां तो स्वतः स्वतःलाच ओळखूं शकला नव्हता. कुठलातरी वाट चुकलेला एक जीव नभोमंडळाच्या अनन्त पोकळींतून पिंगा घालीत भोंवऱ्यासारखा भरकटत चालला आहे असाच कांहींसा भास त्याला झाला होता. पण हळूहळू अंधारांतले हे भास स्थिरावले अन् त्याला आठवलं कीं, आपण आजारी आहोंत, जिवंत आहोंत...एकाएकीं त्याला आपल्या मुलांची आठवण झाली. खरखरीत झालेल्या जिभेचा मधला भाग टाळ्याला लावून त्यानं तोंडाची चव घेतल्यासारखं केलं नि गेले पंधरा दिवस घेत असलेल्या तांबड्या औषधाचा किळसवाणा वास आपलं पोट ढवळून काढीत आहे असं त्याला वाटलं. घशाला कोरड पडल्याचा त्याला भास

झाला म्हणून त्यानं जिभेचं टोंक बाहेर काढून तें तडकलेल्या ओठांवरून फिरवलं तेव्हां त्याला आपले ओंठ खारट झाल्याची जाणीव झाली. तेवढ्यांतच त्याच्या त्या विळविळीत जिभेखालून लाळेचा एक घोट पूर आलेल्या नदीसारखा, त्याच्या सुकलेल्या घशापर्यंत वहात गेला नि कळत नकळत तो गिळून टाकल्यावर अंधारांतल्या अंधारांत तो तारवटलेल्या नजरेनं पाहूं लागला. दांतांवर बुरशी चढल्यासारखं त्याला वाटलं, पण त्याची किळस आली नाहीं. त्यानं डोळे मिटले. एक निश्वास सोडला. नाकांतोंडांत भरलेला तो औषधाचा वास त्याला जाणवला नि घशापर्यंत आलेल्या ओकारीबरोबरच आपल्या पोटांतलीं आंतडींहि बाहेर पडतात कीं काय अशी भीति त्याला वाटूं लागली. आंतड्यांचा विचार मनांत येतांच चिखलांत वळवळणारे तपकिरी, काळसर रंगाचे सर्प त्याच्या नजरेसमोर आले नि सर्पांची आठवण होतांच लिबलिबीत जंतांनींहि थैमान घालण्यास आरंभ केला. डोकं जडावत चाललं. रक्तवाहिन्या मलूल पडल्या. छातीवर भला मोठा दगड ठेवल्यासारखं वाटूं लागलं. स्नायू भाजून निघाले. जठरांतील अन्नरसांना उकळ्या फुटल्या नि हळू हळू समुद्राच्या तळाशीं चाललेल्या फुटक्या जहाजासारखे आपणहि या भुरकट जांभळ्या काळोखाच्या समुद्रांत बुडत चाललों आहोंत असं त्याला वाटूं लागलं...

अंगणांत खेळणाऱ्या मुलांचा किलकिलाट त्याला ऐकूं आला नि डोळे मिटतां–मिटतांच त्यानं ओळखलं कीं, संध्याकाळ झाली आहे. पडल्या-पडल्या तो ती संध्याकाळहि त्या अंधारांत पाहूं शकला. नुकत्याच मावळलेल्या सूर्यबिंबाच्या अंजिरी आकाशानं नटलेली क्षितिजाची भव्य रेषा त्याच्या नजरेसमोर उभी राहिली. रत्नामाणकांचे समुद्र पिसाटल्यासारखे वाटले नि गुलाबी रंगाच्या त्या मुलायम प्रवाहांत मनसोक्त डुंबणारे ढग जेव्हां त्याच्या दृष्टीसमोर तरंगूं लागले तेव्हां त्याला वाटलं, हिरण्यकशपूला मांडीवर घालून त्याच्या पोटांत नखं खुपसणाऱ्या नरसिंहाचीच ही आयाळ भुरभुरते आहे. पण पुन्हां डोळे जड होत चालले. नसानसांत कुणी विस्तवाच्या धारा ओततं आहे असं वाटूं लागलं. आंतल्या आंत अंग तापत चाललं नि पुन्हां त्या तांबड्या औषधाच्या घाणेरड्या दर्पानं भरलेल्या लाळेचा घोट घशापर्यंत गेला...वारा साफ पडलेला असतांनाहि कुठलातरी एक पिंपळ एकटाच सळसळत राहिला

आहे असं वाटूं लागलं. मुलांचा किलबिलाट पुन्हां कानांवर पडला. अश्रूंच्या अभिषेकानं भिजून चिंब झालेल्या, धुमसत्या चिता एकाएकीं भडकूं लागल्या. ओलीं लाकडं तडतडूं लागलीं. जळणाऱ्या चरबीचा चर्र असा आवाज झाला. डोक्याची कवटी फाटकन् फुटली नि अंड्यांतून पिल्लूं बाहेर येतं तसा मेंदू बाहेर पडला. कसलेतरी हिरवे पिवळे रस फसफसूं लागले. नि...नि...या साऱ्यांची ऊब मिळाल्यामुळें बंद पडलेलीं हृदयं पुन्हां उघडूं लागलीं. कुठूनतरी एक भयाण किंकाळी सूं सूं करीत आली नि जळून कोसळत चाललेल्या त्या धगीच्या ढिगाऱ्यांतून एक प्रेत उभं राहिलं. दांत काढून फिदीफिदी हसूं लागलं. पहातां पहातां ताडाएवढं झालं. पहातां पहातां आकाशांत घुसलं. अन्...पुन्हां ती भयंकर किंकाळी आकाशांत घुमली. मृत्युदेवाचं तें आसन फडफडत्या ज्योतीसारखं थरारलं. आकाश कोसळल्यासारखं वाटलं. पुन्हां एकदां ती किंकाळी ऐकूं आली नि मग कांहीं नाहीं....कांऽऽहीं नाहीं... पुन्हां त्या किंकाळीइतकीच भयाण स्तब्धता...सुन्न...शून्य.

तांबड्या औषधाच्या घाणेरड्या दर्पानं बेचव झालेलं तोंड...खरखरीत झालेली जीभ...कोरडा पडलेला घसा...बुरशी चढत चाललेले दांत...तापत चाललेल्या शिरा...उकळत चाललेलं रक्त...भाजून निघालेले स्नायू... संध्याकाळ...अं...अं...कुशींत कळ आल्यासारखी वाटली. कसलातरी गरम गरम गोळा पिसाळलेल्या धूमकेतूसारखा पोटांत वळवळूं लागला...अं ! ही कोण !...पाहिल्यासारखी वाटते आहे...ती हंसण्याची पद्धत ओळखीची दिसते आहे. ती उभं रहाण्याची लकब परिचित वाटते आहे...अन् हातांत काय आहे तिच्या !...न्हालेल्या जणूं गर्भवतीच्याऽऽऽ......अं...!...हा प्रकाश कसला !...कसला !...आई...आईऽऽग.

कुशींत कळ आली. वांफारलेल्या कणकेसारखा तो गोळा पोटांत गरगरूं लागला...पुन्हां लख्कन् झालें नि जीवनाच्या जरतारी स्वप्नांची घडी हळू-हळू उलगडली जाऊं लागली...दिवसरात्रींचीं पानं फडफडलीं अन् त्याचं मन ओहोटीच्या लाटांसारखं मागं मागं खेंचलं जाऊं लागलं. धनुष्याची दोरी आकर्ण ताणली गेली नि स्मृतीचा बाण वीजेसारखा तळपत, अभिजितासारखा लखलखत त्या अंधाराच्या पोकळींत गिरगिरूं लागला...

मरणाचा उन्माद चढलेलं, शुक्राच्या पिसाऱ्यासारखं तेजानं धुंदावलेलं, मोत्यासारख्या टपोऱ्या अश्रूंनीं भारावलेलं हें स्वप्न तुम्हांला पहायचं असेल, तर आपले डोळे मिटून बुब्बुळं आंतल्या आंत गरगर फिरवा...तें...तें—पहा...त्या निळ्याजांभळ्या वर्तुळाच्या आंत...त्या हिरव्यापिवळ्या चौकोनांच्या बाजूला...

शू ऽऽ...अगदीं अलगद पावलं टाका, अजिबात आवाज होऊं देऊं नका. त्याला पडणारीं स्वप्नं तुम्हींहि पहातां आहांत याची यत्किंचित्‌हि दाद त्याला लागतां कामा नये. जर का त्याला चाहूल लागली तर त्याचीं हीं स्वप्नं भस्म होऊन जातील...तिरडीवरून प्रेतानं उठून बसावं तसा तो खाडकन् उठून बसेल नि आकाशाच्या निळ्या रंगांत घिरटणाऱ्या घारीनें जमिनीवरून सरपट जाणाऱ्या सर्पाच्या मस्तकावर अचूक झडप घालावी तसा तो तुमच्या नरडीवर झेंप घेईल...

पडवींत बसलेलीं तीं चार पोरं...माजघरांत एका कळकट गोधडीवर वळकुट्या करून झोंपलेलीं तीं दोन पोरं अन् स्वयंपाक घरांत चुलीवरचं पिठलं ढवळीत असलेल्या त्याच्याभोंवतीं हातभर जिभा बाहेर काढून लाळ घोटत रहाणारीं तीं सहा पोरं एवढ्या माणसांचं हें घर आहे. या घरांत जाणती अशी स्त्री नाहीं. कारण या बारा पोरांची आई अन् तापानं फणफणत राहिलेल्या या अगडबंब पुरुषाची बायको एवढी एकच जाणती स्त्री वर्षभरापूर्वीं या घरांत होती पण तेराव्या खेपेलाहि तिच्या पोटांतला गर्भ वाढूं लागला तेंव्हां देंव्हाऱ्यांतल्या देवाचे पाय धरून तिनं म्हटलं, 'आतां सोडव या जंजाळांतून. या कपाळीचं कुंकू अभंग आहे तोंवर या भल्या घरांतून जाऊं दे रे मला.' मृत्युदेवानं तिच्या कुशीचा आश्रय घेतला अन् वारा पिऊन हां हां म्हणतां वाढत जाणाऱ्या घटोत्कचासारखा तिच्या उदरांतला तो जीव वाढूं लागला. नऊ मास पूर्ण झाले. भूकंपाच्या वेळेला पृथ्वीला होतात, तशा वेदना तिला होऊं लागल्या...घोतर पिळतात तशीं कुणीतरी आंतडीं पिळवटल्यासारखं वाटूं लागलं... जोरजोरानं ओरडण्याची इच्छा झाली...पण आंतल्या आंत कुणीतरी जीभ खेचूं लागलं, घशाची नळी दाबूं लागलं...पुन्हां पोटांत मनस्वी वेदना होऊं लागल्या. वेदना...वेदना...किनाऱ्यावर फेंकल्या गेलेल्या माशासारखा जीव तडफडूं लागला. हातपाय थंड होऊं लागले. अन् रक्ताच्या थारोळ्यांत चाललेली ही धडपड निवून गेली...

तापानं फणफणत पडलेला हा पुरुष इथल्या मराठी शाळेंत मास्तर आहे. इतिहास, गणित वगैरे विषय त्याला पोटापुरते येत असले तरी केवळ पोटापुरतीच मास्तरकी केली पाहिजे अशी त्याची स्थिति नाहीं. त्याचा तो प्रचंड देहच पहा कीं ! त्याच्या नजरेला नजर द्यायला तुम्हांला सहा पिढ्यांची मर्दुमकी खर्ची घालावी लागेल. त्याच्या एकेका हाताचे दंड तुमच्या दोन्ही हातांत मावणार नाहींत. त्याच्या अजस्र पोटावर तुमच्यासारखे दोघे सहज बसूं शकतील. त्याच्या एका उच्छ्वासाबरोबर तुम्हीं चंद्रावर फेंकले जाल. तेरा मुलांचा बाप होऊनसुद्धां अन् आतां स्वतः मरणाच्या मार्गाला लागलेला असूनहि त्याचा पिंड अद्याप इतका मजबूत आहे याचं कारण लहानपणापासूनच हें शरीर पहाटेच्या निरागस वाऱ्यावर, गाईच्या फेंसाळ दुधावर, धान्याच्या कोंवळ्या लोंब्यांवर पोसलें गेलें आहे हें होय. लहानपणींच हा आपल्या पिढीजात श्रीमंत असलेल्या चुलत्याला दत्तक गेला अन् याचं नशीब थोर म्हणून आपल्या अपार दौलतीनं भरलेले हंडेच्या हंडे याच्या पदरांत ओतून तो चुलता मरून गेला. वयाच्या अठरा वर्षांपर्यंत यानं कुस्त्या मारण्याशिवाय दुसरं कांहीं केलं नाहीं...याच्या वैभवावर दबा धरून बसलेले लोक याच्या कानांत सांगूं लागले, ‘ अरे तूं आतां वयांत आला आहेस. म्हणत असलास तर आमच्या गोदूला उजवून टाक...काय ? ’ त्यानंहि विचार केला कीं, मरेपर्यंत का अशाच कुस्त्या मारीत रहायचं आहे ?...अन् या शिगोशीग भरलेल्या दौलतीचं काय करायचं ?...

त्यानं खूप विचार केला. आरशांत पाहून दंड थोपटले. मांड्या खण-खणावल्या अन् मानेच्या शिरा ताठ करून तो स्वतःशींच म्हणाला, ‘ बेट्या, असा बघतोस काय ?...आतां घराला राणी आणायची. दौलतीला मालकीण शोधायची. ’ कांहीं दिवसांनीं, त्यानं एकदोघां प्रतिष्ठित धेंडांच्या मध्यस्थीनं एक मुलगी पाहिली, पसंत केली. बेंडबाजा बोलावला अन् शेंड्या धरून आणलेल्या दोन भटांच्या मदतीनं आपलं लग्न उरकून घेतलं. पुढं काय झालं हें आतां दिसतंच आहे. पुऱ्या बारा गोळ्यांना जन्म दिल्यावर, दौलतीच्या त्या राणीनं त्याच्यापुढं हात टेकले अन् तिनं त्याला म्हटलं, ‘ आतां पुरे. मी पार थकून गेलें आहें. ’ पण तरीहि तेराव्या गर्भानं जीव धरला. या बाळंतपणांतून आपण

सुखरूप बाहेर पडत नाहीं हें तिनं ओळखलं अन् प्रसूतीची वेळ जसजशी जवळ येत चालली तसतशी ती बावरल्यासारखं करूं लागली. मुंबईला भटक्या मारायला गेलेल्या थोरल्या दोन मुलांना तिनं ताबडतोब बोलावून घेतलं. आपल्या चारी मुलींच्या वेण्याफण्या ती स्वतः जातीनं करूं लागली. मुलांचे कपडे कुठं मानेवर, कुठं पाठीवर गेले होते ते शिवून दिले. थोरल्या मुलाला श्रीखंड आवडतं म्हणून एक दिवस श्रीखंड केलं. अन् अशी...हळू हळू ती कुणाला नकळत निर्वाणाची तयारी करूं लागली. तुळशीवृंदावनापुढं निरांजन लावतांना अश्रूंच्या दोन पाकळ्या, कुणाला चाहूल लागूं न देतां जमिनींत झिरपूं लागल्या. जगावसं वाटत होतं. संसारवृक्ष पुरा जोमांत आलेला पहावासा वाटत होता. पण आतां ती पार दमून गेली होती. पुढचा प्रवास तिला झेंपण्यासारखा नव्हता म्हणून ती तिथंच थबकली होती. मागं मागं गेलेल्या वेशी नीट न्याहाळून पहात होती. आपल्या साऱ्या मुलांच्या वैभवाच्या नद्या तिच्या नजरेसमोर झुळझुळत होत्या......आशा अपुऱ्या होत्या, आकांक्षा अतृप्त होत्या तरी तिला धन्य वाटत होतं. म्हणूनच दारीं आलेल्या संकटाला ती डगमगली नव्हती. वागणुकींत थोडी कातरता आली होती. पण हें खरं असलं तरी ज्या धीरानं ती आपले निर्वाणाचे श्वास घेत होती तो धीरपूर्ण, विदग्ध समाधीच्या अवस्थेला गेलेल्या स्थितप्रज्ञालाच शोभण्यासारखा होता.

दिवस जाऊं लागले. हिंवाळ्यांतील अश्वत्थासारखीं कालवृक्षाचीं पानं गळूं लागलीं. अन् एके दिवशीं मध्यरात्रीं त्या घरांतल्या जाणत्या स्त्रीनं महायात्रेची आवराआवर सुरू केली. तिच्या हालांच्या हकीकती गांवांतल्या रिकामटेकड्यांच्या कानीं कधींच गेल्या होत्या. त्या अवाढव्य पुरुषाला रस्त्यावरून जातांना कुणी पाहिलं कीं, त्याच्याकडे पाहून ते मोठ्यानं खांकरत नि म्हणत 'देव तरी काय लेकाची पाजी माणसं निर्माण करतो!' असल्या अर्थाचीं कितीतरी वाक्यं त्याच्या कानावर आलीं होतीं. तो या साऱ्याचा अर्थ समजून चुकला होता. पण त्याला तो तरी काय करणार होता? पहिली गोष्ट अशी कीं, ज्याच्यावर पूर्ण भरंवसा टाकावा असा एकहि डॉक्टर त्या गांवांत औषधालाहि शोधून मिळण्यासारखा नव्हता. अन् एक होता तो पहिल्या घरांतील स्वतःचाच भाऊ होता. अन् त्या दोघांमधून तर विस्तव जात नव्हता.

आपल्या बायकोला अलिकडच्या दोनतीन बाळंतपणांत झालेला त्रास त्यानं पाहिला होता. दुसऱ्या गांवाहून डॉक्टर आणावा तर आतां जवळ पैसा राहिला नव्हता. तिच्या प्रसूतीची वेळ येत चालली तसा तो सैरावैरा धांवत सुटला. एक सोडून तीन डॉक्टरांना घरीं आणलं. पण सगळेच लेकाचे घोत्री निघाले. सगळ्यांनीं तिच्या पोटावर टिचक्या मारून पाहिलं, हातांनीं दाबून पाहिलं अन् कोऱ्याकरकरीत चेहऱ्यांनीं ‘ काळजी करायचं कां ऽऽ हीं कारण नाहीं ’ असं सांगितलं. जातांजातां डोळ्यांचे चष्मे नीट केले नि फीसाठीं पुढें केलेल्या हातावर दक्षणा पडतांच, दरोडेखोर पळतात तसे ते बदमाष्र ढुंगणाला पाय लावून पळून गेले. सारे उपाय थकल्यावर, एक दिवस त्याच्या मनांतहि आलं कीं, खालीं विन्याकडे जावं अन् त्याला हात जोडावे. भाऊ म्हणून आम्हीं एकमेकांचीं तोंडें बघायला तयार नसलों तरी आमच्या वैरासाठीं या बिचाऱ्या बाईचे प्राण आपण कां धोक्यांत घालावेत ? या खोट्या अभिमाना-पायीं अडून बसलों तर मानवहत्त्येचें पाप माझ्यावर येईल...अन्...अन्...पण एकदम काय झालें कुणास ठाऊक ! भुताला पाहून बैल बुजावा तसा तो बावचळला. एकाएकीं त्यानं छाती फुगवली. मानेच्या शिरा ताठ केल्या अन् स्वतःशींच तो म्हणाला, ‘ नाहीं...अहं...नाहीं... नाहीं...हाच काय पण यापेक्षां भयंकर प्रसंग कोसळला तरी त्याच्या घरची पायरी चढणं मला शक्य होणार नाहीं... ’ त्याचं अंग थरथरूं लागलें. डोळ्यापुढें अंधार सांकळला. मनांत कसलेतरी कुणाचेतरी शब्द घुमूं लागले. त्याचे प्रतिध्वनी छातीच्या आंतल्या भागावर येऊन आदळले नि पुनः घुमले...पुन्हां...पुन्हां...पाषाण...पाषाण आहेस तूं ! ’

या संघर्षाच्या लाटा आकाश खायला उठल्या. घड्याळाचे काटे भुकेलेल्या लांडग्यासारखे धापा टाकीत पळूं लागले. अडगळीच्या खोलींतील खाटेवर ती कण्हत पडली होती. गांवांतून धरून आणलेली पिकल्या केसांची सुईण उगीचच इकडून तिकडे धांवत होती. माजघरांतला कंदील मंदावला होता अन् पडवीवरचा कंदील बाळंतिणीच्या खोलींत गेल्यामुळें पडवीवरती अंधार सांचला होता. बारांपैकीं नऊं पोरं पेंगून जमिनीवरच झोपीं गेलीं होतीं. थोरलीं दोन मुलें नाइलाज म्हणून जागीं होतीं. अन् आई आतां

आपली थोड्या वेळापुरतीच सोबतीण आहे हें ओळखून एक मुलगी झोंप विसरली होती. माजघरांतील कपाटाच्या, खुर्च्यांच्या, दांडीवर वाळत घात-लेल्या कपड्यांच्या केवढाल्यातरी सावल्या भिंतीवर उतरल्या होत्या. मंदावणाऱ्या कंदिलाबरोबर त्यांचा भकासपणा वाढत चालला होता. हा अवाढव्य पुरुष एका खांबाच्या आधारानें पडवींत उभा राहिला होता. त्याची छाती एकसारखी वरखालीं होत होती. कपाळावर घाम थबथबला होता. डोळे तारवटले होते. एकाएकीं त्यानं कसलातरी निश्चय केला नि पायऱ्या उतरून तो खळ्यांत आला. तुळशीपुढचं निरांजन एव्हांना विझून थंड झालं होतं. जातां जातां त्याचा पाय त्याला लागला अन् झेपांड्या खात खात तें चार हातांवर जाऊन पडलं. तो रस्त्यावर आला अन् डावीकडच्या पायऱ्या उतरून खालच्या घराचं दार ठोठावूं लागला. आंतलीं सगळीं माणसं झोपीं गेलीं असावीं. दोनतीनदां दार ठोठावल्यावर विनायकाच्या बायकोनं दार उघडलं नि अर्धवट डोळे उघडीत तिनं विचारलं, ‘ कोण ? ’

‘ मी...मी...गोविंदा. ’

‘ वहिनींचं कांहीं जास्त ? ’ तिनं दचकून विचारलं अन् त्याच्या उत्त-राची वाट बघत न रहातां ती आंत गेली. माजघरांतील कंदिलाची वात मोठी झाली अन् विनायक उठून बसला.

‘ कोण आलं आहे ? ’

‘ भावोजी. वहिनींचं कांहीं जास्त दिसतं आहे, उठा. ’

‘ कोण ?...गोविंदा ?...माझ्या घरांत ? छट्—’

‘ आतां भलतंसलतं कांहीं बोलत बसूं नका. आधीं बॅग घ्या अन् चला. ’

तो अवाढव्य पुरुष बाहेरच उभा होता. त्याचं अंग अजूनहि थरथरत होतं. छाती दमलेल्या वाघासारखी वरखालीं होत होती. थोडा वेळ जिकडे तिकडे विलक्षण स्तब्धता पसरली. गटारांतल्या घाणींत लडबडलेला एक उंदीर कुचकुच करूं लागला. बाजूच्या घरांत कुणीतरी खोकल्यासारखं वाटलं.

थोड्या वेळानं विनायक बॅग घेऊन बाहेर आला नि सदरा घालतां घालतां त्यानं त्याच्याकडे न पाहतांच विचारलं, ‘ काय होतं आहे ? ’

‘ पोटांत दुखायला लागलं आहे. ’

‘ किती वाजल्यापासून ? ’

‘ साधारण अकरा वाजल्यापासून. ’

अन् मग बराच वेळ कुणी बोललं नाहीं. आंत माजघरांत कुजबुज चालली होती. ‘ इश्श् ’ काय बाई तरी माणसांचा अभिमान ! अरे स्वतःला एक दारांत यायला लाज वाटते तर पोरांबरोबर तरी आधीं कळवायचं होतं ! शेवटीं याच दारांत आला ना...हं...पाषाणालासुद्धां पाझर फुटत असेल अशा वेळीं... ’

विनायकनं सदऱ्याचीं बटणं लावलीं अन् बॅग हातांत घेऊन तो त्याच्या पाठोपाठ निघाला. उभ्या जन्मांत ज्या भावांनीं परस्परांचीं तोंडं पाहिलीं नव्हतीं ते भाऊ मध्यरात्रीच्या त्या भयानक वेळेला एकमेकांच्या पावलांचा आधार घेऊन चालत होते. कुणी कुणाशीं बोलत नव्हतं, तरी प्रत्येकजण स्वतःशीं मनांतल्या मनांत खूप बोलत होता.

‘ त्यांत लाज कसली आली ? हरकत नाहीं...याच्या दारीं जावं लागलं तर त्यांत कसला कमीपणा आला आहे ? माझ्यावर उपकार थोडेच करणार आहे ? इतरांकडे जातो तसा माझ्याकडे येईल. पैसे घेईल. बस्स. आणखी काय ? ’

‘ हं, काय माज चढला होता हरामखोराला ? वेळप्रसंग आहे म्हणून बोलायचं नाहीं एवढंच. सबंध जन्मांत माझ्या दारांत येणार नव्हता म्हणे. दगड आहे शुद्ध, नाहींतर काय ? ’

मानापमानाच्या भावना हेलकावे खात होत्या. दोन दुखावलेलीं मनं परस्परांना न्याहाळून घेत होतीं. आंतल्या पोकळींत मोठमोठीं, भरघोस वादळं उभीं राहिलीं होतीं. बाहेर मात्र नाटकाच्या पडद्यासारखं सारं निश्चल होतं.

मृत्युदेव दरबारांतून निघाला होता. त्याच्या कृष्णकांतीच्या तेजाचा आधार घेऊन घनघोर अंधाराची वैतरणा झुळझुळूं लागली होती. निसर्गाला त्याच्या पावलांची चाहूल लागली. वाऱ्यानं खुणेची शीळ घातली अन् आसमंतांत निःस्तब्धता पसरली. त्या भयाण स्तब्धतेचा घुम्...घुम् असा आवाज आकाशाच्या छतावर आपटला.

पायऱ्या चढून ते दोघे रस्त्यावर आले. उजवीकडे वळले. खळ्यांत आले मघाशीं पडलेलं निरांजन विनायकाच्या पायाला लागलं. पण त्यानं पायाला काय लागलं हें खालीं वळूनहि पाहिलं नाहीं. पडवीवरच्या अंधारांत भीषणता मिसळली होती. माजघरांतील कंदिलाचा प्रकाश जवळजवळ संपल्यासारखाच झाला होता. थोरल्या मुलांपैकीं एक गुडघ्यांत मान घालून बसला होता. झोंपलेलं वाईट दिसेल म्हणून कसेबसे त्यानं डोळे उघडे ठेवले होते एवढंच. त्यापलिकडे त्याच्या जागृतीला कांहीं अर्थ नव्हता. मघांपासनं जागी असलेली ती शहाणी मुलगीहि एव्हांना पेंगू लागली होती. पण इतकं असूनहि तिचं लक्ष मधूनमधून त्या अडगळीच्या खोलीकडे गेल्याशिवाय रहात नव्हतं. आंतला कण्हण्याचा आवाज बराचसा मंदावला होता अन् सुईणीची धांवाधांव रंगांत आली होती..

विनायक बॅग घेऊन तडक आंत गेला तो बरोबर दहा मिनिटांनीं बाहेर आला. हात धुवायला त्यानं पाणी मागितलं अन् तो पडवींत जाऊन उभा राहिला. तो अवाढव्य पुरुष स्वयंपाकघरांत गेला अन् पाण्यानं भरलेला एक तांब्या नि साबणाची वडी घेऊन तिथं आला. अजून कुणी कुणाशीं बोलत नव्हतं पण पाण्याची धार हातावर पडूं लागतांच विनायकाची वाणी स्रवूं लागली, ‘माझ्यापरीनं मी प्रयत्न केला. पण केस हातची गेली होती. अन् मूलहि गेलेलंच आहे. थोडं आधीं कळतं तर...’ पाण्याची धार जोरजोरानं पडूं लागली. पहातां पहातां ताब्यांतलं पाणी सरून गेलं...

रात्रींच सगळीं मुलं जागीं झालीं होतीं. वडलांना धोतराच्या सोग्यानं डोळे पुसतांना पाहून मोठा मुलगा रडूं लागला अन् मग सगळीं रडूं लागलीं...

पहाटेच्या सुमारास तिला पायरीवर बसून आंघोळ घालण्यांत आली. नवं लुगडं नेसवलं. ओटी भरली. अन् सगळ्या कच्च्याबच्च्यांचा निरोप घेऊन ती निघून गेली.

विनायकाच्या घरांत कुणीतरी कुजबुजलं, ‘काय जाबन गृहस्थ तरी बाई! कितीतरी मरणं या डोळ्यांनीं पाहिलीं. पण हें असलं...शी...... तीं एवढीं एवढीं पोरं रडत होतीं पण त्या माणसाच्या डोळ्यांत एखादं टिपूस तरी!...हं...’

सकाळीं सगळीकडे सामसूम झालं. सूर्य उगवला पण तो रित्या वैभवाचा. वारा झुळझुळला पण तो रिकाम्या डौलाचा.

दिवस वर येऊं लागला तसतशी विनायकानं तिला वांचविण्यासाठीं घेतलेल्या अपार कष्टांची रसभरीत हकीकत गांवांत पसरूं लागली. पहाटेच्या अंधारांत, छाती फोडून बाहेर येऊं पहाणारा आक्रोशाचा लोंढा ओंठ दाबून दाबून थोपविणाऱ्या त्या अगडबंब पुरुषाची जिकडे तिकडे छीःथू होऊं लागली- तरीसुद्धां तो पाषाण कचरला नाहीं. खवळलेल्या सागराच्या भुरकट पृष्ठभागा-वरून लोळण घेणाऱ्या प्रचंड लाटांच्या धडका, किनाऱ्यावरील काळेकभिन्न फत्तर जितक्या सहजतेनें झेलूं शकतात तितक्याच सहजतेनं त्यानं लोकगंगेचा हा निर्लज्ज प्रवाह ताठर छातींत थोपवून धरला.

अस्थींचं गाठोडं हातांत घेऊन तो परतला तेव्हां सूर्य डोकीवर आला होता. अजूनपर्यंत तिरप्या पडलेल्या सावल्या पावलांत जिरून गेल्या होत्या. बाहेरच्या पेरविणीला त्यानं तें गांठोडं बांधून ठेवलं अन् एक दीर्घ निःश्वास सोडून तो त्या ओल्या पायऱ्या चढूं लागला. चारपांच मुलं कोंपऱ्यांत बसून कवड्यांचा डाव खेळत होतीं. थोरले दोन मुलगे आकाशाकडे टक लावून पहात राहिले होते. त्यांच्यांतला एक अधूनमधून धाकट्या भावाच्या पाठीवरून हात फिरवीत होता. त्या बारा पोरांची आई वारली असली तरी त्यांच्या पोटांतली भूक अद्याप जिवंतच होती. कुणीकुणी स्वयंपाकघरांत जाऊन डबेहि रापून पाहिले. पण खाण्याजोगं असं कांहींच कुणाला सांपडलं नाहीं...

तो अवाढव्य पुरुष पायरीवरून एकदम वळला नि कुणाकडेहि न पहातां तसाच बाहेरच्या बाजूनं विहिरीवर गेला. दोनतीन तांबे अंगावर ओतून घेतले नि स्वयंपाकघरांत जाऊन तो शेगडी पेटवूं लागला. बायको वारली त्याच अडगळीच्या खोलींत तांदळाची कणगी होती. एका पातेल्यांतून चुलीवर आधण ठेवून तो त्या खोलींत आला. बाहेर उन्हानं जमीन करपून निघाली होती, तरी त्यावेळीं ती खोली जांभळ्या आंधारानं कांठोकांठ भरली होती. खोलींत पाऊल टाकतांच तिनं जीव सोडला त्या जागीं ओझरतं पाहून घेतलं नि तांदळाच्या कणगीला डोकं टेकून तो लहान मुलासारखा रडूं लागला. जिनं आपल्याला जन्मभर सोबत केली तीहि अखेरच्या क्षणीं आपल्यावर उलटली असं क्षणभर

त्याच्या मनांत आलं. पण त्याच्या मनाची तशी समजूत होईना. कांहीं वेळ तो तसाच रडत राहिला होता. पुन्हां त्यानं त्या खाटेकडं अन् रक्तानं भरलेल्या चिरगुटांकडं पाहून घेतलं अन् तारवटलेल्या डोळ्यांनीं तो एखाद्या वेड्यासारखा आजूबाजूला पाहूं लागला. छट्, सगळं जग माझ्यावर उलटेल, पण ती कशी जाईल माझ्याविरुद्ध ? तिला किती त्रास दिला मी ! पुरतं जगूंहि दिलं नाहीं. समाधानानं मरूं दिलं नाहीं. प्राण गेला तेव्हां तिला माझी आठवण तरी झाली असेल कीं नाहीं कुणास ठाऊक ! पण मी तरी काय करूं हो...मी तरी काय...काय...करूं हो ! ज्याच्या घराची पायरी जीव गेला तरी चढणार नाहीं अशी शपथ घेतली होती त्याच्या दारांत पदर पसरून बेशरम्यासारखा उभा राहिलों, त्याला हात जोडले...अन् शेवटीं...शेवटीं जें नशिबांत होतं तें झालं...आतां मी काय करूं ?...या बारा पोरांना एकट्यानं कसं संभाळूं ?... पुन्हां अश्रूंची एक लाट गडबडा लोळत आली. पण त्यानं हृदयाचा फत्तर केला. फुलांसारखी ती लाट झेलली. जवळच्या खिळ्याला टांगून ठेवलेलं सूप काढलं अन् कणगींतच ठेवलेल्या मापट्यानें तो तांदूळ काढूं लागला...

...तो डाव्या कुशीवर वळला. एव्हांना बरीच रात्र झाली होती. मुलं जेवून झोंपण्याच्या तयारीला लागलीं होतीं. मध्येंच त्याला वाटलं, कुणीतरी आपल्या अंगाला हात लावून गेलं...'अण्णा, चहा घेणार ?' असे कांहींसे शब्द त्याच्या कानांवर पडले. त्यानं निजल्यानिजल्याच 'ऊंऽऽ' केलं नि पायाच्या पोटऱ्या जोरजोरानं एकमेकांवर घासल्या. मघाचं तें स्वप्न पुन्हां दिसूं लागलं...तें पहा...

...कणगींतच ठेवलेल्या मापट्यानं तो तांदूळ काढूं लागला. एक—दोन तीन—एकाएकीं त्या खोलींत कसलंतरी विलक्षण तेज फांकल्यासारखं झालं. दचकून त्यानं आजुबाजूला पाहिलं...अं...अं...हें खरं आहे ? मी पाहतों तें खरं आहे ?...तूं इकडे कुठं ? म्हणजे रात्रीं तूं वारली होतीस ना ?

त्या धवल प्रकाशांत मध्यरात्रीं गेलेली ती बाळंतीण नुकत्याच जन्मलेल्या आपल्या मुलाला हातांत घेऊन उभी होती. तिचे केस मोकळे होते. आकाश-गंगेच्या रंगाचें, पांचूमाणकांच्या धारींचें वस्त्र ती नेसली होती. त्याच्याकडे पाहून ती गालांतल्या गालांत गोड हंसली अन् हातांतलं मूल त्याच्याकडे देण्यासाठीं तिनं हात पुढं केले...

अन् पुन्हां...अंधार झाला. अंधारांतच कुणीतरी हंसल्यासारखं त्याला वाटलं. ए, रानटी माणसा...जग तुझ्या तोंडावर थुकतं आहे...तूं पाषाण-हृदयी...उलट्या काळजाचा आहेस असं ओरडून ओरडून सांगत आहे... ही ही ही ही...हा हा हा हा...पाषाण...हा हा हा...पाषाण!

त्याला वाटलं, आतां मरेपर्यंत रडतच बसावं. त्यानं तांदळाचं सूप खालीं ठेवलं. धोतराच्या सोग्यानं नीट डोळे पुसले नि सूप घेऊन तो स्वैंपाकघरांत आला. तांदूळ निवडतांना त्यानं मनाशीं नक्की ठरवून टाकलं कीं, आईवेगळ्या या पोरांना यापुढं तिची आठवण होऊं द्यावयाची नाहीं. त्यांना आवडेल असं जेवण करायचं. त्यांचे कपडेलत्ते जागच्याजागीं ठेवायचे, त्यांचं आंघोळीचं पाणी तापवायचं, त्यांना आंघोळी घालायच्या...

अन् इतक्यांत त्याला आठवण झाली, मुलांना भारी आवडतं म्हणून मरायच्या आधीं दोनचार दिवस तिनं श्रीखंड केलं होतं. तो लगेच उठला. माजघरांतील खुंटाळ्यावर लोंबत पडलेल्या पिवळ्या डगल्यांतून त्यानं कांहीं पैसे काढले अन् ते मोठ्या मुलाच्या हातांत ठेवून त्याला म्हणाला, 'बाबूराव शिरधनकराचं दुकान ठाऊक आहे न्? तिथें जा नि दीड शेर श्रीखंड घेऊन ये' तो मुलगा कितीतरी वेळ त्याच्याकडे नुसता पहातच राहिला. आपली आई वारल्याला अजून पुरते पंधरा तासहि उलटले नाहींत अन् हा आपला बाप श्रीखंड आणायला सांगतो आहे हें काय?...

'काय आलं कीं नाहीं ऐकायला?'

'अं?...होय...होय...'

'बाबू शिरधनकर. दीड शेर श्रीखंड...'

अधिक कांहीं ऐकण्याआधींच त्या मुलानं तिथून काढता पाय घेतला. स्वयंपाकघरांतली एक पातेली घेऊन तो शिरधनकराच्या दुकानांत आला तेव्हां शिरधनकरानं, मयताला जमलेलीं माणसं परस्परांकडे पहातात, तसं त्याच्याकडं पाहिलं नि उगीचच च्‌ च्‌ करून म्हटलं, 'तुमची आई वारली रात्रीं असं ऐकलं. फार वाईट झालं.' त्या मुलानं नंदिबैलासारखी मान हलवली.

शिरधनकरानं डोकीवरची घामटलेली टोपी काढली. आपल्या तुळतुळीत टकलावरून हात फिरवला अन् थोबाड फुटक्या खुजासारखं करून चारपांच

गिऱ्हाईकांचे पैसे बरोबर मोजून घेतले नि बऱ्याच वेळानं त्या मुलाकडे वळून विचारलं, ' हँ...क्याय पायज्ये तुम्हांला ? '

' श्रीखंड '

' किती ? '

' दीड शेर ! '

एकाएकीं तो भानावर आला.

' आँ...तुम्हांला शीरीखंढ...? '

' होय. दीड शेर. कसं शेर आहे ? '

शिरधनकरानं डोक्यावरची टोपी चाळवल्यासारखी केली नि गालांतल्या गालांत हंसत तो पांड्याला म्हणाला, ' पांड्या, ही घे दुसरी पातेली. आपल्या गोविंदराव मास्तरांची. दीड शेर तोल...चल...चल...पटकन्... '

त्या दिवशीं तो अवाढव्य पुरुष दोन घांस ताकभात जेवला. त्या ताकाचं विरजण आदल्या रात्रीं मेलेल्या त्या बाईनंच लावून ठेवलं होतं. त्याच्या बारा पोरांनीं मात्र बोट चाटत चाटत त्या दीड शेर श्रीखंडाचा फन्ना उडवला. त्यांची भूक अजून वारली नव्हती.

हां हां म्हणतां ही बातमी गांवांत पसरली. शिरधनकराच्या दुकानांतून ती जी निघाली ती थेट बरोबर विरुद्ध दिशेला असलेल्या धर्मशाळेच्या व्यवस्थापका-पर्यंत जाऊन पोंचली. जो तो प्रत्येकाच्या कानाला लागून कुजबुजूं लागला, ' मिस्टर आहांत कुठं ? बाहेरच्या पेरवणीला बायकोची गरम गरम रक्षा अन् आंत जेवायला दीड शेर श्रीखंड...अहो, कोण म्हणून काय विचारतां ?...आपला गोंद्या पाषाण. पण बेटा सुटला एकदां बायकोच्या जंजाळांतून. नाहींतर आणखी किती पोरांच लेंढार मागं लावून गेली असती कोण जाणे ! तरी बापड्या त्या विनायक डॉक्टरानं म्हणे तिच्यासाठीं खूप खटपट केली. पण या राक्षसाला काय त्याचं ! मरावी म्हणून नवस केला असेल, अन् नवसाचं श्रीखंड आतां ओरपीत बसला असेल... '

तो प्रचंड पाषाण मात्र मुकाट्यानं जगत होता. पहाटे कोंबड्याच्या पहिल्या बांगेबरोबर तो उठे. आयुष्याचं यंत्र सुरू होई. रहाटाचीं चक्रं फिरूं

लागत. आंघोळीचं पाणी तापूं लागे. पांचसहा पेले चहाचं आधण उकळे. तोंपर्यंत एका पाठोपाठ एक मुलं उठत, तोंड धूत नि चहाला येऊन बसत. नंतर तो भाकरीचं पीठ मळायला बसे. त्या अडगळीच्या खोलीसकट सगळ्या घरांतून केरसुण फिरवी. तुळशीपुढें एक निरांजन लावी...मग मुलांच्या आंघोळी...त्यांचा अभ्यास...त्यांचं जेवण...खरकटीं भांडीं, धुणेरीं गड्यासाठीं बाजूला काढून ठेवणें...अन् स्वतः शाळेंत जाणं...चुलीवर भाकऱ्यांची पुरचुंडी ठेवलेली असे. दुपारीं मुलं धुव्वा उडवून टाकीत, पाणी पीत नि शाळेचा रस्ता धरीत. धाकटीं दोन मुलं दाते वकीलांच्या घरीं जात. त्यांच्या मुलांबरोबर खेळत नि संध्याकाळीं घरीं परतत...

थोरला मुलगा नोकरी शोधायला म्हणून मुंबईला गेला. त्याच्या पाठचा लोकलबोर्डाच्या कचेरींत कारकुनी करूं लागला...

अशीं दिवसरात्रीचीं चक्रं फिरत होतीं. मधें मधें मुलांचे कपडे फाटत, ते शिवून घ्यावे लागत. कुणाचं डोकं दुखे, त्यांच्यासाठीं सांबरशिंग उगळावं लागे. कुणाच्या पोटांत तिडीक उठायची, त्याला सारपंदीचें पाळ द्यावें लागे अन् हें सारं त्या मुलांची आई बनलेला तो बाप करी.

बाजारपेठेंत त्याचं नांव ठेवलं गेलं होतं—गोंद्या वेताळ. शाळेंत—बेरडे मास्तर. खालीं, प्रत्यक्ष भावाच्या घरांत—सैतान नि इतरत्र—पाषाण !

हा पाषाण जेवणं झाल्यानंतर मुलांचीं अंथरूणं घालून देई. त्यांच्या डोकीवर तेल घाली. अंगावर पांघरूण घाली. अन् मग एकटा कितीतरी वेळ बाहेर पडवींत जाऊन बसे अंधारांत कुणाशीं तरी बोलत राही. अन् बाजूला जिकडे तिकडे सामसूम झाली कीं, माजघरांतील कंदिलाची वात बारीक होई अन् तो अवाढव्य देह तीनसाडेतीन हाती गोधडीवर पसरे. कितीतरी दिवस अन् रात्री गेल्या—पण अशी एकहि रात्र गेली नाहीं कीं, त्याच्या डोक्याखालची उशी कधीं अश्रूंनीं भिजली नाहीं ! पण अंधाराची ही किमया मिटल्या डोळ्यांनीं पाहाणाऱ्या लोकांना दिसणार कशी ?...

...त्यानं झोंपेंतल्या झोपेंत अंग चाळवल्यासारखं केलं. श्वास कढकढीत होत चालले होते. मस्तक औषधाच्या दर्पानं भरून गेलं होतं. पडशानं घसा चोंदला होता. अन् डाव्या कुशींत खालच्या बाजूला बारीक बारीक कळा मारूं लागल्या

होत्या. डोक्याखालीं दुणलेला हात काढून त्यानं दोन्ही मांड्यांच्या मध्यें गुडघ्याजवळ दाबून धरला नि जरतारी स्वप्नाची ती उलगडणारी घडी तो निरखून पाहूं लागला...

बर्फाच्या शिडकाव्यानं डोंगरांचीं माथीं पांढरीं फटफटीत व्हावींत तसे त्याच्या डोकीवरचे सगळे केंस पिकले. डोळ्यांच्या भोंवतीं कृष्णकमळीचीं वर्तुळं उमटलीं. वाळूंतल्या दगडांसारखीं गालाचीं हाडं वर येऊं लागलीं. पूर्वी अंगाबरोबर बसणारे कपडे थोडेसे सैल होताहेतसे वाटूं लागले. ओल्या कांचेतून पहावं तसं डोळ्यांना दिसूं लागलं. शिकवतांना, स्मरणशक्तीबरोबरच जीभहि दगा देऊं लागली. बाजारांतले लोक म्हणूं लागले, पापाण म्हातारा झाला. शाळेंतलीं पोरं म्हणालीं, बेरडे मास्तरांचीं अर्धीं लाकडं गेलीं एकदांचीं स्मशानांत.

चंदन घांसलं जात होतं. अन् अजूनहि तें घांसलं जायचं होतं. नियतीच्या विपण्ण, निःसंग मार्गावरचा एकाकी मुशाफीर थकत आला होता. पण अजूनहि थोडंसं अंतर कापायची धमक त्याच्या हाडामासांत होती. एका महान् निष्ठेच्या सेवेसाठीं तो या दिवसापर्यंत जगला होता अन् अंगांत जगायची हिम्मत होती तोंपर्यंत जगणारहि होता.

पण तसं व्हायचं नव्हतं. पुन्हां वाजतगाजत, गर्जतवर्षत मृत्युदेव दरबारांतून निघाले. वाऱ्याला चाहूल लागली. तो गुडूप करून बसला...

झोंपेतल्या झोंपेत त्याला आठवलं, एक दिवस पहिल्या बांगेबरोबर आपण उठलों नाहीं. आपली थोरली मुलगी बाराच्या घरांत येऊन पोंचली आहे. तिला शेगडी पेटवतां येते. चहा करतां येतो. भात अन् डाळीची आमटी उकडतां येते...त्या दिवशींहि तिनंच सारं केलं. त्याच्या सांगण्यावरून तुळशीपुढं निरांजन लावलं. नंबर दोनच्या मुलानं त्याच्या अंगाला हात लावून पाहिला अन् विजेचा शॉक बसावा तसा धाडकन तो मागं ओढून घेतला. चहा झाल्यानंतर त्यानं केंसांवरून फणी फिरवली अन् तडक तो डॉक्टरकडे गेला. एक चकार शब्द न बोलतां त्यानं दोनचार दिवस औषध घेतलं नि कांहींच गुण दिसत नाहीं हें पहातांच तो त्या मुलाला म्हणाला, 'आतां पुरे करा हीं औषधं. बरं व्हायचं नशिबांत असतं तर एव्हांना खडखडीत बरा व्हायला पाहिजे होतों. आज नको औषध आणूं.' आपलं अंथरूण त्यानं त्या अडगळीच्या खोलींत

न्यायला सांगितलं नि 'हरे रामाऽऽ' करीत त्याच्यावर अंग टाकलं. आणूं नको असं सांगितलं असतांहि मुलानं औषध आणून ठेवलेलं पहातांच तो आंतल्या आंत बराच संतापला, पण त्याला एक अक्षरहि बोलला नाहीं. संध्याकाळीं मुलगा कचेरींतून घरीं आला तेव्हां औषधाची रिकामी बाटली पाहून त्याला हायसं वाटलं. पण कोनाड्यांतल्या मोरींत कसला तरी उग्रसा दर्प येत होत त्याकडे त्याचं लक्ष गेलं नाहीं...

स्वप्नाची घडी इथपर्यंत उलगडली अन् अवसेच्या रात्रीं आकाशांतून विजेचा लोळ खालीं यावा तसा प्रकाश त्याच्या डोळ्यासमोर पसरला. कसलंतरी प्रचंड चक्र फिरत असल्यासारखा आवाज आला नि मघांची ती, आकाशगंगेचं वस्त्र नेसलेली मुक्तकेशा बाळंतीण त्याच्याकडे पाहून गालांतल्या गालांत हंसत असलेली त्याला दिसली. तिच्या हातांत नुकतंच जन्मलेलं एक मूल होतं नि हात पुढं करून ती त्याला 'घ्या...घ्या...' असं म्हणत होती...

त्याला आजूबाजूला कसलीतरी कुजबूज चालल्यासारखं वाटलं. हजारो लोक आपल्याभोंवतीं जमल्याचा भास झाला. त्यानं डोळे उघडून पाहिलं, तेव्हां पहिल्या प्रथम त्याला अंधाराखेरीज कांहींच दिसलं नाहीं, पण हळू हळू विरत जाणाऱ्या धुक्यांतून सृष्टि दिसावी तशी त्याला आपल्याभोंवतीं गराडा घालून उभीं असलेलीं माणसं दिसूं लागलीं...हा नारायण...हा केशव...ही बेबी...हा गंपू...हा शंकर...अरे, हीं सारीं इथें जमून काय करताहेत ? आपलं जास्तबिस्त आहे कीं काय ?...आई...आईग...आईग...पुन्हां आला कुशींत गोळा... अरे मेलों...मेलों...धरारे मला...वांचवारे मला...आईग...ओय्...ओय्... मग कुणीतरी सदऱ्याचीं बटणं सोडल्यासारखा भास झाला...

'शेगडींत विस्तव आहे का ?'

'आहे.'

'मग पाणी तापत ठेव पाहूं. अगदीं उकळूंदे चांगलं. अन् हें पहा, हीं इंजेक्शनं टाक त्या पाण्यांत मग...'

'पण काका, बरे होतील ना हो आमचे अण्णा ?'

'कां नाहीं होणार ?...जा पण तूं झोंप जा पाहूं आतां.'

थोडा वेळ स्मशानशांतता पसरली. पडल्यापडल्याच तो शाळेंतल्या मुलांना शिकवूं लागला, भाकरीचं पीठ मळूं लागला. मुलांचे फाटलेले कपडे शिवत बसला...

'हं, हें घ्या गरम पाणी.'

'आणलंस? हीं इंजक्शनं टाक त्यांत. हळू बरं का!'

'तसं कांहीं जास्त नाहीं ना हो अण्णांचं?'

'कांहीं घाबरूं नकोस. ही ट्यूब धर पाहूं हातांत.'

पुन्हां स्मशान-शांतता. मधून मधून चिता तडतडावी तसा भांड्यांचा किणकिणाट. आलाऽऽ पुन्हां आला...अयाई...ओय्...ओय्...अन् हें काय? कोण छातींत सुरी खुपसतं आहे? कोण?...कोण?...औषध आणूं नको म्हणून सांगितलं होतं तें ऐकायला आलं नाहीं का?...हॅट...सरा बाजूला...जाव...हटा इथनं...काय करायचीं आहेत हीं औषधं मला?...

तितक्यांतच इंजेक्शनची ती चकचकीत डबी हातांतून निसटली नि खालीं पडली. त्याबरोबर तो अवाढव्य पुरुष जागा झाला. ही सारी गोतावळ आपल्या भोंवतीं कशाला जमली आहे हें आधीं कितीतरी वेळ त्याच्या लक्षांतच येईना. पडल्या पडल्याच त्यानं डोकं वर करून इकडे तिकडे पाहिल्यासारखं केलं नि बऱ्याच वेळानं त्याच्या ध्यानांत आलं कीं, आपण आजारी आहोंत. आपली बायको वारली त्याच खोलींत, त्याच खाटेवर, त्याच अंथरुणावर निजलों आहोंत. पुन्हां त्यानं आपल्या पोरांकडे नजर टाकली नि पेटाऱ्यांतल्या नागासारखं आपलं डोकं उशीवर ठेवलं.

'ती डबी घे पाहूं इकडे जरा.' जवळपासच कुठून तरी आवाज आला...

त्याला तो आवाज ओळखीचा वाटला. न कळतच त्याच्या मानापमानाच्या भावना उफाळून निघाल्या नि तो एकदम अंथरुणांत उठून बसला. एकाएकीं त्याचे डोळे तारवटले. अंग थरथरूं लागलं नि कसाबसा खाटेचा आधार घेऊन तो त्या दिशेनं पाहूं लागला.

'हा...हा...इथं?...कुणी...कुणी बोलावलं याला इथं?...अरे बोला

...कुणी बोलावला? औषध नको म्हणून सांगितलं होतं तर हें कशाला?... गांवांतले बाकीचे डॉक्टर साफ मेले?...बोला, ऐकायला येत नाहीं काय? कुणी आणला याला इथं?...अरे वाचा बंद झाली का एकेकाची?...अं...अं... अरे बोला, बोला, याला कशाला आणला इथं? बायको मेली त्या दिवशीं मी स्वतः याच्या घराची पायरी चढलों होतों. आयुष्यभर जोपासलेल्या अभिमानाच्या भावना गुंडाळून ठेवून केवळ तिच्यासाठीं मीं याचे पाय धरले होते. पण आज हा इथं कां?...जगायचं माझ्या नशिबांत असेल तर औषधावांचून जगेन. मला औषध नको. अन् प्राण गेला तरी याचं औषध नको.' एकाएकीं हातवारे करून तो किंचाळूं लागला. शंभर हत्तींची शक्ति त्याच्या अंगांत आली होती. पण मग तो दमला. त्याला पुढं बोलवेनासं झालं. या साऱ्या प्रकारानं गांगरून गेलेलीं पोरं हुंदके देऊन रडूं लागलीं. क्षणभर तो अंथरुणावर बसला. कांहींतरी बोलण्यासाठीं म्हणून पुन्हां उठला पण त्याच्या त्या डोंगराएवढ्या प्रचंड शरीराला आंतून पोंखरून काढणाऱ्या त्या रोगानं त्याला तसं करूं दिलं नाहीं. निमिषार्धांत तें प्रचंड धूड खालीं कोसळलं.

विनायकानं त्याला इंजेक्शन द्यायचा प्रयत्न केला. पण त्याचा हात लावून घ्यायलाच तो तयार होईना. 'नाहीं...नाहीं...जगायचं असेल तर बेइज्जतीनं मला जगायचं नाहीं. हें इंजक्शन बेइज्जतीचं आहे. मरेन...पण असलं कांहीं मी करून घेणार नाहीं!'

यावर विनायकहि कांहीं अधिक बोलला नाहीं. त्यानं थर्मामीटर झाडून ट्यूबमध्यें टाकला. स्टेथोस्कोप गुंडाळून कोटाच्या बाहेरच्या खिशांत ठेवला. इंजेक्शनची सुई वगैरे त्या चकचकीत डबींत टाकली नि बॅग घेऊन हात न धुतांच तो मुकाट्यानं निघून गेला.

यानंतर कांहीं फारसे दिवस गेले नाहींत. कुठल्याहि डॉक्टरच्या औषधावांचून त्यानं शिकस्तीनं सात आठ दिवस काढले नि एक दिवस मध्यरात्रीच्या सुमारास सगळीं मुलं झोंपीं गेलेलीं असतांना त्यानं अनंत कालाच्या निद्रेसाठीं डोळे मिटले. कुणाशींहि त्याला कांहीं बोलायचं नव्हतं. बोलण्यासारखं कुणी माणूसहि त्यावेळीं जवळ नव्हतं. डोळे मिटतां मिटतां नि शेवटचे आंचके लागतां लागतां त्याला आकाशांतून विजेचा लोळ खालीं आल्यासारखं वाटलं...

त्या तेजांतून ती मुक्तकेशा रूपगर्विता बाहेर आली नि नुकतंच जन्मलेलं एक मूल त्याच्याकडे देण्यासाठीं तिनं हात पुढें केलेले त्यानं पाहिले...अन् मग सारा काळोख झाला...सारा काळोख...काळोख...काळोखाचा अथांग समुद्र...

पूर्वेला तांबडं फुटलं. त्याची ती मोठी मुलगी जागी झाली. तिनं चुलींत लाकडं घातलीं नि त्यावर चहाचं आधण ठेवून अण्णांना उठविण्यासाठीं ती त्या अडगळीच्या खोलींत आली. तिच्या बापाचा तो प्रचंड देह सुस्त झालेल्या अजगरासारखा ताठ होऊन पडला होता. कुठंहि कसलीहि हालचाल होत नव्हती. ती त्या शरीराजवळ गेली. अण्णांना तिनं मोठमोठ्यानं हांका मारल्या. त्यांना दोन्ही हातांनीं हलवून पाहिलं. पण अंह...! ती एकदम घाबरली. तिनं त्यांच्या डोळ्याकडं पाहिलं. तिला वाटलं...रडतां रडतां ते झोंपी गेले असावेत...अन् झोंपेंतच...' ती दचकली. तिच्या मनांत भलतंच कांहींतरी आलं. धांवत धांवतच ती माजघरांत आली नि सगळ्या भावंडांना तिनं जागं केलं...सगळ्या भावंडांना तिनं त्या देहाजवळ नेलं...सगळ्या भावंडांनीं त्या देहाला कवटाळलं नि हुंदके देऊन देऊन तीं रडूं लागलीं. चुलीवरचं चहाचं आधण उकळून उकळून जात होतं तरी तिकडे कुणाचं लक्ष नव्हतं...

थोरल्या मुलानं जाऊन दाते वकीलांच्या कानावर सारी हकीकत घातली. दाते वकील आले नि पाहून गेले...दहा अकराच्या सुमारास सातआठ माणसं गोळा झालीं नि तें प्रचंड धूड खांद्यावर मारून घेऊन गेलीं.

विनायक सकाळच्या मोटारीनं कुठल्या एका केससाठीं साखरप्याला गेला होता. अर्थातच प्रेतयात्रेला तो हजर नव्हता.

त्या दिवशीं शाळेला सुट्टी मिळाली. गोंद्या वेताळ मेल्याची बातमी बाजारपेठेंत वाऱ्यासारखी पसरली. शाळेंतील वात्रट पोरं उड्या मारीत मारीत, 'असाच एकेक मास्तर रोज मेला तर काय बहार होईल!' असं म्हणूं लागलीं.

दुपारीं साडेतीनच्या सुमारास मंडळी परत आली ती बाबू शिरधनकराच्या दुकानावरून. गोविंदरावांचा गोटा केलेला मुलगा नि त्याच्या पाठोपाठ येणारी सातआठ बोडकीं माणसं पहातांच तो काय समजायचं तें समजला नि आपल्या पांड्याकडे पहात मोठ्यानं ओरडला, 'पांड्या, दीड शेर शीरीखंड तोलायास घे बघूं ऽऽ'.

विनायक दिवे लागणीच्या सुमारास आला. तोंपर्यंत सारा सोहळा संपला होता. गोविंदाच्या मरणाची बातमी ऐकतांच त्यानं तोंड थोडंसं वाईट केलं. पण कां, कुणास ठाऊक, घराच्या पायऱ्या चढतांना नेहमींपेक्षां त्या दिवशीं त्याच्या पावलांतलं तारुण्य उठून उभं राहिलं होतं. आजूबाजूला पाहून त्यानं एक दीर्घ निःश्वासहि सोडला.

त्या दिवशीं गोविंदरावांचीं अकरा पोरं विनायकाकडे जेवायला होतीं. जेवणानंतर विनायक पोस्टांत गेला नि गोविंदाच्या मुंबईला असलेल्या बाराव्या मुलाला त्यानं तार केली, 'Anna Serious Start Instantly..

दुसऱ्या दिवशीं सकाळीं कडक ऊन पडलं होतं. गोंद्या वेताळाचं अंथरूण खळ्यांत आणून टाकलं होतं. दोनतीन पोरं त्यावर कोलांट्या मारीत होतीं. विनायकाच्या घरांत कुणीतरी कुजबुजत होतं, 'इस्स्...काय बाई पोरं तरी! अगदीं बापाचा नमुना. आहे कांहीं सुखदुःख!'

१९४८

* * *

: १३ :

# पाळणा

मुलीचं पहिलंच बाळंतपण म्हणून मरिअमची आई मुद्दाम गॅलीलीहून आली होती. आज सकाळीं उठल्याबरोबर मरिअमच्या पोटांत दुखूं लागलं तेव्हांच तिनं हेरलं कीं, आज ही बाळंत होणार. तिनं लगेच आपल्या जांवयाला बोलावून घेतलं नि त्याच्या कानांत ती कुजबुजली, 'कांहींहि करून आज पाळणा घरांत आलाच पाहिजे.' माजघरांत विव्हळत पडलेल्या मरिअमकडे त्यानं आपली मलूल नजर वळवली नि तिच्या वेदना पहावेनाशा झाल्या तेव्हां तो पुन्हां ओटीवर येऊन बसला.

'कांहींहि करून आज पाळणा घरांत आलाच पाहिजे...' आपल्या भुरक्या, तांबूस दाढीवरून हात फिरवीत तो विचार करीत होता, 'पाळणा आणला पाहिजे हें खरं, पण मी तरी काय करूं? खिशांत नाहीं विष खायला दिडकी...'

एप्रिल महिन्यांतील त्या पिवळ्याधमक, तापलेल्या उन्हाचा लोंढाच्या लोंढा जेरुसलेम शहरावरून वहात होता. जसजशीं तीं उन्हं मांजरपावलांनीं आभाळाच्या छपरावर चढत होतीं तसतसे सावल्यांचे उंदीर पावलांखालच्या बिळांखालीं लपत चालले होते. कुठं एखादा गाढवांचा ताफा पाठीवरचीं ओझीं झुकवीत झुकवीत ऐसपैसपणें चालला होता. उंटांच्या गळ्यांतील घंटांचा आवाज एकटाच किणकिणत होता.

थोड्या वेळानं तो आपणहूनच उठला नि खुंटाळ्यावरचं मुंडासं काढून तें डोक्याला बांधीत माजघरांत आला. एकच क्षण त्यानं आपल्या विव्हळणाऱ्या बायकोकडे केविलवाण्या नजरेनं पाहिलं नि तो सासूला म्हणाला, ' मी जातों. '

' कुठं ? '

' रानांत कांहीं लाकूडफांटा मिळाला तर पाहतों. '

' लाकूडफांटा कशाला ? '

' पाळणा हवा आहे नं ? '

' इकडे जवळपास कुणीकडे नाहीं का मागून मिळायचा ? '

' पण कशाला ? मी एवढा चांगला धडधाकट सुतार असतांना... '

' शक्यतों लौकरच ये. घरांत पुरुष मनुष्य कुणी नाहीं. कांहीं लागलं सवरलं तर... '

त्यानं कोंपऱ्यांत उभी करून ठेवलेली कुऱ्हाड उचलली नि ' बरं ' असं म्हणून तो बाहेर पडला.

झपाझप पावलं टाकीत तो रानच्या दिशेनं चालूं लागला. वाटेंत पायलेटच्या राजवाड्यापाशीं बरेच लोक रेंगाळत असल्याचं त्याला दिसलं.

' काय गडबड आहे ? ' त्यानं ओळखीच्या एका गृहस्थाला विचारलं.

' नाटक आहे नाटक... ' तो गृहस्थ खंवचटपणें म्हणाला.

' नाटक ? कसलं नाटक ? '

' एका बेवकूफ माणसाच्या मरणाचं... '

' म्हणजे ? मला नाहीं समजलं ! '

यावर तो गृहस्थ एखाद्या राक्षसासारखा मोठ्यानं हंसूं लागला.

' हा हा हा ..म्हणे मला नाहीं समजलं...हा हा हा हा...बेट्या तो नाझरेथचा दाढीवाला बादशहा येशू .. '

' हां हां...काय झालं त्याचं ? '

' आज त्याला खिळे ठोकून ठोकून मारायचा आहे. मूर्ख लेकाचा ! स्वतःला तो ईश्वराचा पुत्र म्हणवतो. ज्यू लोकांचा बादशहा म्हणून मिरवतो...'

'पण...'

'तेव्हां आज दुपारीं गॉलगोथ्याच्या टेकाडावर यायचं बरं का? मोठी गंमत बघायला मिळणार आहे गंमत. पाहूं या तर खरं हा ईश्वरपुत्र कसा तिळतिळ मरतो तें. तेवढीच फुकटांत करमणूक. हां, तर मग यायला विसरूं नकोस. अन् ही कुऱ्हाड घेऊन कुठं चाललायस मरायला या उन्हांतून?'

'जरा रानांत जायचं आहे.'

'जा...जा...रानांत जा नाहींतर मसणांत जा. दुपारीं गॉलगोथ्याच्या डोंगरावर यायला मात्र विसरूं नकोस.'

गांवाची तटबंदी मागें पडली. गॉलगोथ्याच्या डोंगराला उजवं घालून पुढं होतां होतां त्यानं त्या डोंगरावरून धावती नजर फिरवली. तो राठ, उघडा-बोडका, भुरा डोंगर त्या तसल्या उन्हांत मांड ठोकून बसला होता. नुकते कुठें त्याच्या छाताडावर हिरव्या हिरव्या गवताचे पुंजके डोकावूं लागले होते. भुकेलेल्या मेंढरांना त्याचं तेवढंहि वैभव बघवत नव्हतं. तीं आपली खुशाल त्या पोपटी मलईला तोंड लावीत होतीं.

चालतां चालतां तो नाझरेथच्या येशूचा विचार करूं लागला. त्यानं किती तर्कवितर्क केले, पण येशूला आज दुपारीं या डोंगरावर खिळे ठोकून कां मारणार आहेत याचा कांहींच हिशेब त्याला करतां येईना. एकदोनदां तो त्याच्या प्रवचनांनाहि गेला होता. पण हा माणूस इतका भयंकर असेल याची त्याला कल्पना नव्हती. भयंकर नाहींतर काय? उगीच पायलेटसारखा गव्हर्नर त्याचा जीव घ्यायला उठेल?...पण नाहीं हो, या लोकांचं कांहीं तरी चुकतं आहे...नक्कीच...

त्यानं रानच्या हद्दींत पाऊल टाकलं तेव्हां बाभळींच्या शेंड्यावर बसलेले पोपटांचे थवे कुलकुलूं लागले. त्यांच्याकडे पहात तो मनांतल्या मनांत पुटपुटला, 'आज...दुपारीं...गॉलगोथ्याच्या डोंगरावर...' कुऱ्हाड घेऊन तो कितीतरी वेळ रानांत भटकत राहिला. पण सुक्या, तयार लाकडाची एकहि फांदी त्याला गवसली नाहीं. हताश होऊन तो ओढ्यावर आला नि ओंजळीनं पाणी पिऊन तिथंच एका झाडाखालीं घटकाभर लवंडला. डोळे मिटतां मिटतां त्यानं पाहिलं, एक गोजीरवाणी खार झाडाच्या फांदीवर बसून आपल्याकडे कुतूहलपूर्वक

पहात आहे. गालांतल्या गालांत त्यानं हंसल्यासारखं केलं नि स्वतःशींच तो कुजबुजला, ' आज...दुपारीं नाटक आहे नाटक...एका बेवकूफ माणसाच्या मरणाचं...ये तर खरा ! तेवढीच फुकटांत करमणूक...! '

त्याला जाग आली तेव्हां सूर्य थोडा पश्चिमेकडे कलत चालला होता. डोळे चोळीत तो उठला नि कुऱ्हाड खांद्यावर टाकून त्यानं घरची वाट धरली.

गॉलगोथ्याच्या डोंगरावर अजून शुकशुकाट होता. तटबंदी ओलांडून तो गांवांत आला तेव्हां पायलेटच्या राजवाड्यासमोर लोकांची गर्दी जमल्याचं त्याला दिसलं. तसाच तो गर्दीत शिरला नि धक्काबुक्की करीत पुढें झाला.

' आम्हांला बाराब्बास हवा...'

पायलेटच्या शेजारींच नाझरेथचा येशू खालीं मान घालून उभा होता. डाव्या हाताला हातांत बेड्या घातलेला बाराब्बास उभा होता. पायलेट पुन्हां पुन्हां लोकांना विचारीत होता, ' तुम्हांला कोण हवं ? येशू कीं बाराब्बास ?'

अन् शिकवल्या पढवल्यासारखे लोक ओरडत होते, ' बाराब्बास. '

इतक्यांत कुणींतरी त्याच्या खांद्यावर हात ठेवला. त्यानं दचकून मागं वळून पाहिलं. रानांत जातांना पायलेटच्या वाड्यापाशीं भेटलेलाच तो गृहस्थ होता.

' कधीं आलास तूं ? मी तुलाच पहात होतों...'

बोलतां बोलतां त्यानं एक सोन्याचं नाणं त्याच्या हातांत दिलं नि त्याच्या कानाशीं लागून तो म्हणाला, ' हां...मोठ्यानं ओरड...बाराब्बास... बाराब्बास... '

' पण—हें काय आहे ? '

' आज पासओव्हरचा सण आहे नं ? आज लोक म्हणतील त्या गुन्हेगाराला पायलेट जीवदान देऊं शकतो... '

' मग ? '

' नाझरेथचा राजद्रोही येशू नि बाराब्बास या दोघांतून आपण त्याची निवड करायची आहे... '

' पण बाराब्बास हा तर कसलेला दरोडेखोर आहे... '

‘ पण नाझरेथच्या त्या उद्धटापेक्षां तो परवडला... ’

इतक्यांत पायलेटनं पुन्हां एकदां प्रश्न केला.

‘ बोला...बाराब्बास कीं येशू ? ’

अन् सगळ्यांच्या बरोबर तोहि नकळत ओरडला, ‘ बाराब्बास... बाराब्बास... ’

आणि मग पायलेटनं सोन्याच्या झारींतून पाणी मागविलं नि रुप्याच्या तबकांत हात धुतां धुतां म्हणाला, ‘ हरकत नाहीं. त्याचा जीव घ्यायची तुमची इच्छाच आहे तर तसं होऊं द्या. पण या तुमच्या पापांत मी सहभागी नाहीं...’

पुन्हां एकदां लोक ओरडले ‘ बाराब्बास...बाराब्बास... ’

मरिअमच्या नवऱ्याला समजेना कीं, पायलेट असं कां म्हणाला ? येशूला कां फांशी दिलं जातंय् हेंहि त्याला नक्की माहीत नव्हतं अन् हातांतलं तें सोन्याचं नाणं कुरवाळीत तो इतरांबरोबर ओरडत होता, ‘ बाराब्बास... बाराब्बास... ’

त्याला घरीं जायची ओढ लागली होती पण ‘ नाझरेथच्या एका बेवकूफ माणसाच्या मरणाचं ’ हें नाटक पहाण्याचा मोहहि त्याला आवरत नव्हता. ‘ नाहींतरी आपण घरीं राहून काय करणार होतों ? आपल्याला काय कळतंय् बायकांच्या बाळंतपणांतलं ? एकीकडे बाराब्बास...बाराब्बास असं ओरडणारं त्याचं मन दुसरीकडे त्याला अशा तऱ्हेनं समजावीत होतं. बाराब्बासचे हात साखळदंडांतून मोकळे झाले. तो व्यासपीठावरून खालीं उतरला नि गर्दीत दिसेनासा झाला.

इतक्यांत दोन अक्राळविक्राळ शिपाई पुढें झाले नि त्यांनीं येशूच्या अंगावरील कपडे टराटरा फाडले.

‘ हेल...हेल...यू किंग ऑफ् ज्यूज... ’

‘ ज्यूंच्या बादशहाचा विजय असो... ’

ज्यूंचा राजा आपल्या दरबारांत निघाला होता. कुणीतरी त्याच्या अंगावर जांभळा झगा चढविला. डोक्यावर कांट्यांचा मुकुट ठेवला.

‘ चलो ! ’

नाझरेथचा भोळा येशू जडावलेल्या पावलांनीं पायऱ्या उतरूं लागला... इतक्यांत...

सप्...सप्...सप्...

चामड्याच्या तिपेडी आसुडाचे फटके येशूच्या पाठीवर बसूं लागले...

एक...दोन...तीन...

तीस...चाळीस...

मरिअमच्या नवऱ्याला तें दृश्य पहावेना. त्याला वाटलं असंच पुढं व्हावं नि या कुऱ्हाडीनं...

इतक्यांत त्याच्या खिशांतलं ते सोन्याचं नाणं छनछनलं नि या हाताची कुऱ्हाड त्या हातांत घेण्याइतपतच हालचाल करून तो गंमत पहात उभा राहिला.

नाझरेथच्या येशूची पाठ सोलून निघाली होती. रक्ताच्या ओरखड्यांनीं पाठीचा स्नायु न् स्नायु खिळखिळा झाला होता. फू केलं तरी उडून जाईल इतक्या नाजूक प्रकृतीचा तो नाझरेथचा येशू, तरीहि संथपणानं पावलं टाकीत पुढं चालला होता.

तो पायऱ्यांच्या टोंकाशीं आला तेव्हां एक भलामोठा क्रूस त्याच्या खांद्यावर देण्यांत आला. याच क्रुसावर त्याची नि मरणाची भेट होणार होती. याच क्रुसावरून तो आपलं शेवटचं प्रवचन करणार होता. धडपडत धडपडत तो एकेक पाऊल पुढं टाकीत होता. त्याचे प्राण त्याच्या डोळ्यांत गोळा झालेले दिसत होते. त्याच्या पाठोपाठ त्याच्याचसारखे क्रूस खांद्यावर घेतलेले चोर आपल्या मरणानं मरायला चालले होते.

मुंगीच्या पावलांनीं तो जथा गॉलगोथ्याकडे चालला होता.

नाहीं...नाहीं...आतां माझ्यानं एकहि पाऊल पुढं टाकवणार नाहीं... आई गऽऽ...

चालतां चालतां येशू जमिनीवर कोसळला.

मरिअमच्या नवऱ्याला त्याची दया आली. त्याला वाटलं असंच आपण पुढं व्हावं...नि...

तेवढ्यांत खिशांतलं तें सोन्याचं नाणं किणकिणलं नि मरिअमचा नवरा स्वतःशींच पुटपुटला, 'जाऊं दे, आपण कशाला भानगडींत पडा निष्कारण!'

त्याच्या मागल्या अंगाला कुणीतरी कुजबुजत होतं, 'लेकाला इथंच मरूं देण्यांत मजा नाहीं. डोंगरावर जाऊन पोंचेपर्यंत तरी याला आपण मरूं देतां कामा नये...'

तिथंच उभ्या असलेल्या एका रोमन शिपायानं तें ऐकलं. त्याला ती कल्पना पटली असावी. त्यानं ताबडतोब येशूला फटके मारायचं बंद केलं नि जवळच उभ्या असलेल्या एका धडधाकट इसमाच्या बकोट्या धरून त्याला येशूचा क्रूस घेऊन चालायचं फर्मान सोडलं.

'कोण रे हा?'

'सायमन...'

ही सगळी वरात गॉलगोथ्यावर येईपर्यंत तीन वाजले. नाझरेथच्या येशूनं भंवतालीं जमलेल्या लोकांवरून एकदां नजर फिरवली नि स्वतःशींच तो पुटपुटला, 'आई, तूं?...तूं इथं कशी?'

फक्त मरिअमच्या नवऱ्यानंच तेवढं तें ऐकलं.

मग येशूच्या अंगावरचे कपडे काढण्यांत आले नि सायमनच्या खांद्यावरच्या त्या क्रुसावर त्याला निजविण्यांत आलं...

कच्...

रक्ताची एक चिळकांडी उडाली...डाव्या हाताच्या मधोमध एक खिळा ठोकण्यांत आला...

कच्...

रक्ताची दुसरी चिळकांडी...

उजवा हात मरणानं आपल्या हातांत घेतला...

मग नाझरेथच्या येशूचे दोन्ही पाय एकत्र जुळविले गेले...रक्ताची एक चिळकांडी उडाली...

तीन खिळ्यांत चार जखमा कोरल्या गेल्या...येशूचा क्रूस जमिनींत पुरला गेला.

त्याच्या दोन्ही अंगांना त्या चोरांचे क्रूस उभे झाले...

चैत्रांतली ती ढळढळीत दुपार...

मग एकाएकी ही काळोखी कुठून आली?

मरीअमच्या नवऱ्यानं चौफेर नजर फेंकली. दाही दिशा काळ्या कुळकुळीत ढगांनीं ओथंबत चालल्या होत्या.

पण असं होईलच कसं? एप्रिल महिन्यांत अन् पाऊस?

पहातां पहातां गॉलगोथावरचं आकाशाचं छत काळंकुट्ट झालं. अगदीं मध्यरात्र झाल्यासारखं वाटूं लागलं...

ढग गडगडूं लागले...संतापलेल्या विजांनीं गॉलगोथाचा डोंगर हलवून टाकला...

मरिअमच्या नवऱ्याला वाटलं, हा प्रलयकाल तर नाहीं?

अन् मग पावसाची संततधार लागली. नाझरेथच्या येशूच्या जखमा आणखी ओल्या झाल्या.

हळू हळू लोक पांगूं लागले. आतां निष्कारण पावसांत भिजत राहून काय करायचं होतं? सगळी गंमत आतां आटपली होती... आतां फक्त त्याचा जीवच तेवढा जायचा होता.

पण हॅं...असे कितीतरी लोकांचे जीव जातांना त्यांनीं पाहिले होते. याचा जीव आणखी काय वेगळा जाणार आहे?...

नाझरेथच्या येशूवर मरणाची ग्लानि चढली होती. तरीहि मधूनमधून तो डोळे उघडीत होता नि म्हणत होता, ‘एलॉय, एलॉय, लामा सबकूत्तानी... देवा...अखेर तूंहि मला सोडून गेलास नं?’

हा हा हा हा...हा हा हा हा...

हा ज्यूंचा बादशहा...हा प्रत्यक्ष परमेश्वर...पहा काय म्हणतो आहे?... याला म्हणे ईश्वरहि सोडून गेला...ईश्वराला कधीं ईश्वर सोडून जातो काय? ऑं?...

‘पाणी...पाणी...’

अरे त्याला पाणी हवंय्...'

'मग कर पुढं तो कडू दारूचा हंडा...'

'पाणी...पाणी...'

'अरे परमेश्वराला तहान लागलीय.'

'मग? नाहीं पीत तो ती दारू?'

'तो काठीला बांधलेला स्पंज व्हेनिगरमध्यें बुडवा...'

'जॉन्...पिटर...सायमन...'

'ऐका रे, परमेश्वर कुणालातरी हांका मारतो आहे!

'या बावळट परमेश्वराला स्वतःचा जीवसुद्धां वांचवितां येत नाहीं नि म्हणे मी परमेश्वर...ज्यूंचा बादशहा...'

नाझरेथच्या येशूच्या जांभळ्या झग्यासाठीं चारपांच रोमन अधिकारी जुगार खेळत होते. तिथंच...क्रुसाच्या सावलींत...

अखेर त्यानं मान टाकली. अखेर त्याचे डोळे मिटले. अखेर त्याच्या हृदयाचं कोंकरूं बोलेनासं झालं.

मरिअमचा नवरा दचकला. आकाशाचं पोट फाडून लखलखीत विजेचा एक लोंढाच्या लोंढा गॉलगोथ्याच्या डोंगरावरून वर गेला. मरिअमच्या नवऱ्यानं आपले डोळे दोन्ही हातांनीं झांकून घेतले...

तो घरीं आला तेव्हां रात्र झाली होती. अजून त्याची बायको बाळंत झाली नव्हती.

हुश्‌ करून तसाच तो ओटीवर बसला...त्याचं मन सुन्न झालं होतं... कसलाच विचार त्याला करतां येत नव्हता...

सासूनं दिलेली भाकरी खाऊन तो पुन्हां ओटीवर आला नि बावळटा-सारखा समोरच्या काळ्याकभिन्न आकाशाकडे पाहूं लागला...

त्या दिवशीं त्याचा डोळ्याला डोळा लागलाच नाहीं.

मध्यरात्रीं तो हळूच उठला. कोपऱ्यांत उभी करून ठेवलेली कुऱ्हाड त्यानं खांद्यावर टाकली नि झपाझप पावलं टाकीत तो गॉलगोथाच्या डोंगरावर आला.

आतां तिथं चिटपांखरूंहि नव्हतं. काळ्याकभिन्न आकाशाच्या पार्श्वभूमीवर ते तीन रिकामे क्रूस तेवढे उठून दिसत होते.

मधल्या क्रूसाच्या पायांतली माती त्यानं उपसून काढली नि जरा जोर करून तो क्रूस जमिनींतून बाहेर काढला.

मग कुऱ्हाडीनं त्यानं त्याचे सातआठ तुकडे केले नि ते घेऊन तो घाईघाईनं घरीं आला...

तो कांहींच बोलला नाहीं...

दुसऱ्या दिवशीं एक सुरेखसा पाळणा त्यानं तयार केला.

सासूनं विचारलं 'लाकूड कुठलं ?'

पण त्या दिवशींहि त्याची बायको बाळंत झाली नाहीं. त्या दिवसाची सबंध रात्र ती विव्हळत होती. अन् तो ओटीवर भकासपणें आकाशाकडे पहात बसला होता.

रात्र उलटली. पहाटेचे गार वारे वाहूं लागले.

एकाएकीं त्याच्या बायकोचं विव्हळणं बंद झालं. घाबरून तो पहायला म्हणून आंतल्या खोलींत जाऊं लागला, पण दाराशीं उभ्या असलेल्या सासूनं त्याला आंत जाऊं दिलं नाहीं. बाहेरूनच त्याला सुईणींची गडबड जाणवली...

तो पुन्हां ओटीवर आला...

आकाश थोडंथोडं उजळूं लागलं होतं.

इतक्यांत...शेजारचा अब्राहाम धांवत धांवत त्याच्या घरीं आला नि घाबराघुबरा होऊन म्हणाला, 'ऐकलंस का ?'

'काय रे ?'

'तो परवां गॉलगोथाच्या डोंगरावर खिळे ठोकून मारलेला नाझरेथचा येशू...'

'हां, काय झालं ?'

'त्याचं प्रेत म्हणे नाहींसं झालं थडग्यांतून'.

'असं कसं ?'

‘ कुणास ठाऊक ! पण असं म्हणतात कीं, तो पुन्हा जिवंत झाला आहे म्हणून...’

‘ कशावरून ? तूं पाहिलास त्याला ? ’

‘ नाहीं, पण कांहीं लोकांना तो थडग्यांतून येतांना दिसला...’

‘ तुझा विश्वास आहे या गोष्टीवर ? ’

‘ विश्वास ?...माझा विश्वास ?...अन् तुझा नाहीं ? ’ मरिअमचा नवरा कांहींच बोलला नाहीं.

‘ अन् गॉलगोथ्यावरचा त्याचा एकट्याचाच क्रूस कुणीतरी काढून नेला ! ’

मरिअमचा नवरा शून्य नजरेनं आकाशाकडे पहात होता.

‘ नाझरेथचा येशू उठला...नाझरेथचा येशू थडग्यांतून उठला...’ त्याच्या रिकाम्या मनाच्या घुमटांत याच एका वाक्याचं पांखरू फडफडत होतं.

आंतल्या खोलींतून एका तान्ह्या मुलाच्या रडण्याचा आवाज येत होता. पण त्याचं तिकडे लक्षच नव्हतं. पहाटेचा वारा माजघरांतला तो पाळणा हलवीत होता तेंहि त्याला दिसत नव्हतं. त्याच्या मनांत एकच वाक्य घुमत होतं.

नाझरेथचा येशू जिवंत झाला !

नाझरेथचा येशू जिवंत झाला ! !

१९५२

* * *